






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य पत्रिका


# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. २९८

जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर २००१




## अनुक्रमणिका

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

संपादक : प्रा. रा. श्री. जोग

| | |
|---|---|
| खंड १ ला | रु. ४००/- |
| खंड २ रा भाग - १ व भाग - २ | रु. ३५०/- व रु. ३००/- |
| खंड ३ रा | रु. ३५०/- |
| खंड ४ था | रु. ४००/- |
| खंड ५ वा भाग - १ व भाग - २ | रु. ३५०/- व रु. ३५०/- |
| खंड ६ वा भाग - १ व भाग - २ | रु. ३५०/- व रु. ३००/- |
| | रु. ३,१५०/- |

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनीही रु. २५००/- आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस्. टी. पार्सलने पाठवू.**

*(वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपाल खर्च वेगळा.)*

---

*मराठी साहित्यसृष्टीतील अभिनव उपक्रम म. सा. परिषदेने सिद्ध केलेला अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा इंग्रजी इतिहास खंड*

**A HISTORY OF MODERN MARATHI LITERATURE - VOL. I**

■

संपादक

**श्री. राजेंद्र बनहट्टी, डॉ. गं. ना. जोगळेकर**

■

पृष्ठसंख्या ३५०, किंमत रु. ४००/- ग्रंथ विक्रेत्यांना भरपूर सूट
वैयक्तिक ग्राहकांनीही सवलतीसाठी संपर्क साधावा.

या ग्रंथाचा दुसरा खंड यथावकाश प्रसिद्ध होत आहे.

■

: मागणीसाठी संपर्क :

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरध्वनी : ४४७५९६३.

मराठी साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २९८

जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर २००१



संपादक

प्रा. डॉ. अरविंद वामन कुळकर्णी



**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

दूरध्वनी : ९५२०-४४७५९६३

अनुक्रमणिका

## वार्षिक साधारण सभेची माहिती

*म. सा. परिषदेची यंदाची वार्षिक साधारण सभा रविवार ३० सप्टेंबर २००१ रोजी होणार आहे. यासंबंधी मसापच्या सर्व शाखांकडे आर्थिक व्यवहारासंबंधी मजकूर, ताळेबंद, विषयपत्रिका इत्यादी साहित्य पाठविले आहे. संबंधितांनी त्या त्या शाखांशी किंवा परिषदेच्या कार्यालयाशी पत्राने संपर्क साधावा. पुण्यातील सभासदांनी परिषद कार्यालयात येऊन माहिती मिळवावी.*




**मुद्रक-प्रकाशक** : ह. ल. निपुणगे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

**मुद्रणस्थळ** : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा, पुणे ४११ ०३०.

**अक्षरजुळणी** : यशश्री एंटरप्रायझेस, २४, ईशदान सोसायटी, अभ्यंकर स्टीलजवळ, पौड फाटा, कोथरूड, पुणे ४११ ०२९. फोन : ५४६०६०२.

**मूल्य** : रुपये ३०/- **वार्षिक वर्गणी संस्थांसाठी :** रु. १००/-

**आजीव सदस्य शुल्क** : रुपये १०००/- **वार्षिक सदस्य शुल्क :** रु. १००/-

**अंक क्र. २९८** : जुलै २००१ ते सप्टेंबर २००१


*(महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे. या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही. अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिती नेहमीच सहमत असेलच असे नाही.)*

अनुक्रमणिका

❖
# संपादकीय
❖

संपादन-समिती, सल्लागार-समिती, परिषदेच्या कार्यकारी मंडळातील पदाधिकारी आणि सदस्य या सर्वांच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष सहकार्याच्या जोरावर संपादक म्हणून मी 'पत्रिके'चा गेला अंक प्रसिद्ध केला. लेखकांनी केलेले लेखनदान ही पूर्णार्थाने त्यातील जमेची बाजू होती. या अंकाची वाचकांनी चांगली दखल घेतली, यावद्दल आम्ही सर्वजण वाचकांचे ऋणाईत झालेले आहोत. वाचकांचा हा लाभ टिकावा, यासाठी परिषदेचे हे नवे कार्यकारी मंडळ यापुढेही असेच प्रयत्नरत राहील. त्यासोवतच विनंती अशी की, वाचकांनीही आपला पहारा ढिला होऊ देऊ नये.

अनुकूल आणि प्रतिकूल अशी संमिश्र प्रतिक्रिया, आलेल्या पत्रांतून किंवा तोंडी बोलण्यातून व्यक्त केली गेलेली आहे. ती सर्वच येथे प्रसिद्ध करणे योग्य होणार नाही. पण डॉ. बा. वा. दातार (नासिक), प्रा. म. द. हातकणंगलेकर (सांगली), प्रा. एम. पी. पाटील (वोरिवली-मुंवई), डॉ. भालचंद्र फडके, डॉ. हेमंत इनामदार आणि श्री. म. श्री. दीक्षित (पुणे) अशा ज्येष्ठ बुजुर्गांचा उल्लेख करायला हवा असे वाटते. यासोवतच प्रा. सुरेश जोशी (देवरुख), डॉ. दत्ता भगत (औरंगाबाद), डॉ. दिलीप धोंडगे (सटाणा) यांचाही उल्लेख आवश्यक आहे. या सर्वांची सहानुभूती लेखन सहाय्यात रूपांतरित करण्याचे काम संपादक म्हणून मला करायला हवे. याप्रमाणेच साहित्यक्षेत्राच्या दृष्टीने अपरिचित म्हणता येतील असे कुणी श्रीधर सहस्रबुद्धे (पुणे), सुहास हरीबा जाधव (कराड), तुळशीदास कामत (लोलये, ता. काणकोण, गोवा) यांनीही आपला अभिप्राय पत्राने कळविला आहे. असे आणखीही बरेचजण आहेत. त्या सर्वांचे कार्यकारी मंडळाच्या वतीने मी आभार मानतो. परिषदेच्या वतीने केली जाणारी प्रत्येक गोष्ट ही समूहाने केली जाते, एका व्यक्तीकडून नव्हे!

संपादकीय आणि काही लेख यावद्दल काहींनी विरोधी वा प्रतिकूल प्रतिक्रिया नोंदविली आहे. अनुकूल आणि प्रतिकूल अभिप्राय हे लेखनाच्या बावतीत तसे अटळच असतात. ते गृहीत धरूनच संपादनाचे काम करावे लागते हे वाचकही मान्य करतील असा भरवसा वाटतो. मजकुराच्या चुकीच्या छपाईबद्दलची तक्रार मात्र अक्षम्य मानायला हवी. त्याची दुरूस्ती या अंकात केलेली आहेच, पण अशा चुका पुन्हा होणार नाहीत, असे आश्वासन संबंधित पदाधिकाऱ्यांनी दिलेले आहे. असो.

या अंकातील काही लेखांकडे मी वाचकांचे मुद्दाम लक्ष वेधू इच्छितो. चालू वर्ष हे मा. श्री. ना. बनहट्टी, कवी अनिल (साहित्य संमेलनाध्यक्ष, १९५८. मालवण; पुढे महामंडळाचे अध्यक्ष) आणि डॉ. नांदापूरकर या ज्येष्ठ साहित्यसेवकांच्या जन्मशताब्दीचे

वर्ष आहे. त्यांच्या कार्याचे मूल्यमापन करणारे तीन लेख या अंकात दिलेले आहेत. डॉ. धडफळे आणि डॉ. क्षीरसागर यांचे दोन संशोधनपर लेखही या अंकात वाचकांना आढळतील. डॉ. धडफळ्यांनी शांता नावाच्या दशरथ-कन्येचा शोध रोचक अशा भाषेत घेतलेला आहे. डॉ. क्षीरसागर हे वास्तविक कीटकशास्त्रज्ञ (entomologist) आहेत. साहित्याशी संबंधित नव्हेत. पण त्यांनी शेतीविषयक नियतकालिकांचा घेतलेला संशोधनपर आढावा महत्त्वाचा वाटल्याने या अंकात दिलेला आहे.

ज्येष्ठ साहित्यिक आनंद यादव यांची 'कलेचे कातडे' ही नवी कादंबरी नुकतीच 'मेहता प्रकाशना'तर्फे प्रसिद्ध झाली आहे. मराठी साहित्यातील कलावाद आणि त्याने मराठी साहित्य व साहित्यिकांत रुढ केलेले संकेत हे या कादंबरीचे केंद्र आहे. त्यासाठी यादवांनी नायक म्हणून कुणी कलावादी लेखक कल्पिला आहे. या काल्पनिक नायकाच्या आधारे 'कलेचे कातडे'चा व्यूह उभा राहतो आहे. मराठीत वेगळी ठरू शकेल अशा या कादंबरीची निर्मितिप्रक्रिया यादवांकडून आग्रहपूर्वक मिळविली आहे. ती वाचकांना आवडेल, विचार करायला लावील असे वाटते.

'पाया आणि इमला' ही मार्क्सवादी समीक्षेतील पायाभूत संकल्पना होय. तिचे नेमके विवरण करणारा लेख प्रसिद्ध मार्क्सवादी समीक्षक डॉ. के. रं. शिरवाडकर यांनी या अंकासाठी लिहिला आहे. अभ्यासकांना तो मोलाचा वाटेल, अशी अपेक्षा आहे.

प्रसिद्ध विनोदी लेखिका शकुंतला बोरगावकर, नासिक येथील नाटककार व संगीतकार बाळ भाटे, ख्यातनाम कथाकार व लोकप्रिय कथाकथनकार व. पु. काळे, शिवाजीराजांच्या भूमिकेमुळे प्रसिद्ध असलेले दाक्षिणात्य अभिनेते शिवाजी गणेशन, मराठी साहित्यिक व अभिनेते पद्माकर गोवईकर, माहितीपटांचे निर्माते व दिग्दर्शक दिलीप जामदार, इंदूरचे प्रसिद्ध वकील व साहित्यप्रेमी ॲड. जयंत महाजन (केंद्रीय राज्यमंत्री सुमित्रा महाजन यांचे पती), मराठी नाट्यसृष्टीच्या 'कुलवधू' ज्योत्स्ना भोळे, हडपसर (पुणे) येथील साहित्य संस्कृती मंडळाच्या संचालिका कवयित्री वृषाली तुळजापूरकर, नाट्यपरिषदेच्या नाशिक शाखेचे अध्यक्ष दादासाहेब अंधृटकर, पुण्याचे पुस्तक विक्रेते व प्रकाशक वसंतराव गोगटे आणि सुप्रसिद्ध विनोदी अभिनेते शरद तळवलकर अशा नामवंतांचे नजिकच्या भूतकाळात निधन झाले. म. सा. परिषद त्याबद्दल तीव्र शोक व्यक्त करीत आहे.

'हा तों साहित्यकुसुमांचा आस्वादु', पुस्तकांची साभार पोच, आजीव सदस्यांची यादी आणि शाखावृत्ते इत्यादी मजकूर नेहमीप्रमाणे अंकात दिलेला आहे.

या अंकातील सर्व लेखकांचे आणि अंक सिद्ध करण्यास मदत केलेल्या सर्व सहकाऱ्यांचे मन:पूर्वक आभार. अस्तु. इति लेखनसीमा —

■

प्रा. अरविंद कुलकर्णी
१४, स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे ४११ ०३८. दूरध्वनी : ५४३६१२९.



अनुक्रमणिका

# माझं जीवन आणि साहित्य

❖

**श्रीपाद जोशी**

❖

*(प्रदीर्घ आणि दर्जेदार वाङ्मयीन कार्याबद्दल दिले जाणारे 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक' आणि सन्मानचिन्ह परिषदेच्या ९५ व्या वर्धापनदिनी २७ मे २००१ रोजी श्री. श्रीपाद जोशी यांना केंद्रीय राज्यमंत्री सौ. सुमित्रा महाजन यांच्या हस्ते देण्यात आले. त्या निमित्ताने श्री. श्रीपाद जोशींनी शब्दबद्ध केलेले त्यांचे मनोगत)*

मित्रहो,

महाराष्ट्र साहित्य परिषद या साहित्यिकांच्या प्रतिनिधिक व प्रतिष्ठित संस्थेतर्फे केल्या जाणाऱ्या माझ्या सत्कारासाठी आपण जमला आहात हे पाहून मला आनंद होतो. आपल्या या गुणग्राहकतेबद्दल मी प्रथम आपलं अभिनंदन करतो आणि आभारही मानतो. माझं वृत्तपत्रीय लिखाण वाचलेले आपल्यापैकी बरेचजण असतील; पण माझं साहित्य वाचलेले फारच थोडे श्रोते असतील. मला आजवर जे ७-८ पुरस्कार मिळाले आहेत ते मुख्यत: हिंदी व उर्दू या भाषांत मी केलेल्या कामाबद्दल व प्रामुख्याने अनुवादाबद्दल आहेत. शिवाय माझ्या साहित्यनिर्मितीचा प्रारंभही अनुवादांपासून झाला असल्यामुळे अनेकजण मला केवळ एक अनुवादक किंवा भाषांतऱ्या म्हणूनही ओळखत असतील. वस्तुत: तसा मी काही प्रसिद्धिपराङ्मुख नाही. एकेकाळी मलाही प्रसिद्धीची हाव होती. त्यासाठी करावी लागणारी धडपडही मी त्यावेळी केली. परंतु प्रसिद्धी ही मिळावी लागते. त्यामुळं धडपड करूनही प्रत्यक्ष पदरात काही पडलं नाही, म्हणून मग मी तो मार्ग सोडून दिला आणि माझ्या कामातच मी गढून गेलो. हळूहळू त्याची इतकी सवय झाली की आपल्या कामाची कुणी दखल घेत नाही याचं काहीच वाटेनासं झालं. महाकवी भवभूतीनं आपल्या 'मालती माधव' (१:६) या नाटकात म्हटल्याप्रमाणं 'उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा, कालोह्ययं निरवधिर्विपुलाच पृथ्वी' असं म्हणून मनाची समजूत घातली. पण ही फार नंतरची गोष्ट झाली. साहित्यनिर्मितीच्या प्रारंभकालीच बहुधा याची चाहूल मला लागली होती. १८ जुलै १९४६ रोजी लिहिलेल्या 'आशा' या माझ्या कवितेत मी म्हटलं होतं. 'असेल जगती कुणि न कुणितरी मला चाहणारा, येईल धुंडित कधि न कधी तो वाट पाहणारा!' आजच्या या सत्कारसमारंभाचं निमंत्रण मला मिळालं तेव्हा या आठवणी जाग्या झाल्या.

मात्र या साऱ्या परिस्थितीचा दोष सर्वस्वी इतरांचा आहे, असं मला म्हणता येत नाही. माझं जीवन आणि साहित्य यांचाही त्यात फार मोठा वाटा आहे. खेड्यातल्या एका सामान्य भिक्षुक कुटुंबातला मी मुलगा! कोल्हापूर संस्थानातल्या मुरगूड या गावी पाचवीपर्यंत शिक्षण झाल्यावर माझे थोरले चुलते पं. लक्ष्मणशास्त्री मुरगूडकर मला पुढील शिक्षणासाठी वाईला



अनुक्रमणिका






घेऊन गेले. तिथल्या प्राज्ञ पाठशाला या राष्ट्रीय विद्यालयात मी दाखल झालो. पण एक वर्ष पूर्ण होण्याच्या आतच ब्रिटिश सरकारनं ती शाळा बंद पाडली आणि माझं एक वर्ष वाया गेलं. त्यानंतर काही दिवसांनी माझे धाकटे चुलते कै. ह. मो. जोशी हे मला पुण्याला घेऊन आले. ही १९३३ सालची गोष्ट आहे. तेव्हापासून आजपर्यंत माझी पुण्याशी जी गाठ पडली ती कायम आहे. एका अर्थानं मी पुणेकर बनलो. पण पुणेकरांचे तथाकथित गुणदोष मात्र मला चिकटले नाहीत. मी मनानं मुरगूडकरच राहिलो. इथं कै. न. ल. ऊर्फ नाना आठवले या बालब्रह्मचारी असूनही बालमानसशास्त्र व शिक्षणशास्त्र या विषयांत रममाण झालेल्या एका संतपुरुषाशी संबंध आला आणि माझं सारं जीवनच बदलून गेले. ते माझे जीवन गुरू बनले. नूतन मराठी विद्यालयापासून १९३८ साली मॅट्रिक झाल्यावर मी नानांच्या मार्गदर्शनानुसार आचार्य काका कालेलकर यांच्याकडे वर्ध्याला गेलो. तिथल्या महिला आश्रमाचे कुलपती म्हणून नाना त्यावेळी काम करीत होते. कालेलकर हे राष्ट्रभाषा प्रचाराचं काम करीत होते. त्यामुळे मीही त्याच क्षेत्रात प्रवेश केला. भाषाभ्यास हा माझा छंद आणि कालांतरानं व्यवसाय बनला. वर्ध्याला असताना गांधीजींशी संबंध आला. त्यांनीच मला उर्दू शिकण्यासाठी दिल्लीला पाठवलं. तिथं पंडित वियोगी हरि या हिंदीच्या साहित्यस्वामींच्या मार्गदर्शनाखाली हिंदी संतसाहित्याचं अध्ययन करण्याची संधी मला मिळाली; आणि मी हिंदीत लेखन करायला सुरुवात केली. दिल्लीत एक वर्ष राहून मी वर्ध्याला परत आलो आणि उर्दूचा प्राध्यापक म्हणून तिथल्या अध्यापन मंदिरात काम करू लागलो. पुढं गांधीजींनी हिंदी-उर्दूच्या संयोगातून बनणाऱ्या हिंदुस्तानी या राष्ट्रभाषेचा प्रचार करण्यासाठी 'हिंदुस्तानी प्रचार सभा' ही वेगळी संस्था काढली. तिचा कार्यालय चिटणीस म्हणून माझी नियुक्ती करण्यात आली. त्यामुळं गांधीजींशी अधिक निकटचा संबंध आला आणि मी त्यांच्या विश्वासाला व प्रेमाला पात्र ठरलो. (गांधीजींच्या स्वत:च्या हस्ताक्षरांत व पत्रव्यवहारात याचा पुरावा माझ्याजवळ उपलब्ध असल्यामुळं मी या बाबतीत काही थापेबाजी करतो आहे, अशी शंका कुणाला येऊ शकणार नाही!) या साऱ्याचं वर्णन मी माझ्या 'मी पाहिलेले गांधीजी' या ११६ पृष्ठांच्या छोट्या पुस्तकांत केलंय. मराठीत सध्या त्या पुस्तकाची चौथी आवृत्ती चालू आहे. मराठीखेरीज हिंदी, गुजराती, कन्नड, मल्याळम्, तेलुगु, तामिळ, उर्दू, इंग्रजी वगैरे अनेक भाषांत ते लोकप्रिय झालं आणि त्यानं मला महाराष्ट्राच्या बाहेर अधिक व्यापक क्षेत्रात प्रसिद्धी मिळवून दिली. गमतीची गोष्ट म्हणजे जपानी भाषेतही त्यातला काही भाग प्रसिद्ध झाला होता. केरळच्या कलिकत विद्यापीठात या पुस्तकाच्या मी केलेल्या हिंदी अनुवादाची पाठ्यपुस्तक म्हणून निवड झाल्यानं त्याच्या १५ हजार जादा प्रती काढाव्या लागल्या. मी जरी महाविद्यालयाची पायरी चढलो नसलो तरी माझे पुस्तक एका विद्यापीठात मान्यता पावलं, याची मला गंमत वाटली. दरम्यान १९४२ ते १९४४ या दोन वर्षांच्या काळात येरवड्याच्या कारागृहात राहून अध्ययन-अध्यापन व लेखन करण्याची अमूल्य संधी मिळाली. त्या शिदोरीचा मला पुढं जन्मभर उपयोग झाला. (त्या कालखंडावर आधारित 'तुरुंगातले दिवस' हे माझं आत्मवृत्त, त्यात गुंफल्या गेलेल्या एका प्रेमप्रकरणामुळं कादंबरी म्हणून मान्यता पावलं!) तुरुंगातून सुटल्यावर दोन वर्षं वर्ध्याचं काम करीत राहिलो. पण माझ्या

गोव्याच्या पत्नीला वऱ्हाडाची विषम हवा मानवली नाही, म्हणून मी वर्ध्याला रामराम ठोकून आठ वर्षांनंतर पुण्याला परत आलो. एव्हाना देशाला स्वातंत्र्याचे व फाळणीचे वेध लागले होते. कलकत्ता व नोआखाली इथं निरपराध हिंदूंची लांडगेतोड सुरू झाली होती. ती परिस्थिती सावरण्यासाठी गांधीजी त्या भागात गेले ते पुन: सेवाग्रामला आलेच नाहीत. त्यामुळं मला वर्ध्याला राहण्याचं कारणही उरलं नव्हतं. मी माझ्या 'उलगाउलग' या पहिल्या आत्मचरित्रात सांगितलंय. पण ते आपल्या वाचनात आलं असण्याची शक्यता नाही. म्हणून इथं त्याचा उल्लेख केला आहे.

## मी 'कलम का मजदूर' बनलो!

पुण्याला आल्यावर पोटापाण्यासाठी काय उद्योग करायचा हा प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला. मला परीक्षेचा मुळातच तिटकारा असल्यामुळे मॅट्रिकनंतर मी कुठलीच परीक्षा दिली नव्हती. शिवाय आयुष्यात कुणाकडेही मत किंवा नोकरी मागायची नाही, असं ठरवलं असल्यामुळं राजकारण आणि नोकरी ही दोन्ही क्षेत्रं आपोपआच बाद झाली. म्हणून मग मी लेखन हेच उपजीवविकेचं साधन बनविण्याचा निर्णय घेतला; आणि तो जन्मभर निर्धारानं पाळला. लेखनावर उपजीविका करण्याचं उद्दिष्ट साध्य होण्यात ज्या गोष्टींची मला प्रकर्षानं मदत झाली, त्यामध्ये बहुभाषाकोविदत्व आणि साधेपणाची उपजत आवड या प्रमुख होत्या. सगळ्याच भारतीय भाषा मला आपल्या वाटतात. त्यामुळं अनेक भाषा शिकणं सहज सुलभ झालं. मराठी, इंग्रजी, हिंदी, उर्दू, बंगाली, असमीया, कन्नड, अरबी, फारसी, संस्कृत, कोकणी, उडिया व सिंधी या भाषांशी कमी-अधिक प्रमाणात प्रसंगाप्रसंगानं माझी मैत्री झाली. त्याचा मला अनुवादकार्यात, तसंच शब्दकोश आणि व्युत्पत्तिकोश यांचं काम करण्यात चांगला उपयोग झाला.

## मी एक प्रवाहपतित

या हकीगतीवरून एक गोष्ट लक्षात येईल की अमुक एक महत्त्वाकांक्षा मनाशी बाळगून तिच्या पूर्ततेसाठी पद्धतशीर तयारी करून मी कर्मजीवनात प्रवेश केला नव्हता. एका अर्थानं मी प्रवाहपतितच होतो. हा प्रवाह योग्य दिशेनं वाहणारा होता आणि त्यातून वाहात जाताना नाना आठवले, काका कालेलकर, गांधीजी, विनोबा, दादा धर्माधिकारी, विनोबांचे बालमित्र भाई धोत्रे, आचार्य भागवत यांच्यासारख्या तेजस्वी पुरुषांचा सहवास मला लाभला. ही नियतीची कृपा! त्यातूनच मी घडत गेलो. कोणताही पक्ष, पंथ, संप्रदाय, संघटना, गटबाजी यांत गुंतून पडण्याची माझी मुळातच वृत्ती नव्हती. मला मुक्त जीवन जगायचं होतं. त्याचे फायदेही होते आणि तोटेही होते. 'एकाकी न रमते' या संस्कृत वचनाप्रमाणं माणसाचं मन एकाकी जीवनात रमत नाही. तो ज्या समाजात राहतो त्याच्याशी मिळून मिसळून राहाणं त्याला भाग पडतं. मी जो मार्ग स्वीकारला त्यात अहोरात्र कष्ट करण्याची गरज होती. त्यात एकाकीपणाला, एकाग्रतेला फार महत्त्व होतं. ही एकाग्रता लहानपणापासूनच माझ्यात असावी,

असं वाटतं. त्यामुळं आपण एकांडे शिलेदार आहोत याची मला कधी खंत वाटली नाही. प्रसिद्धी, पुरस्कार, सन्मान मिळविण्यासाठी देवाणघेवाण, साटंलोटं करण्याची गरज असते. पण तसं करण्याची मला कधी इच्छाच झाली नाही आणि जेव्हा काही काळ त्या मार्गानं जाण्याचा मोह झाला तेव्हा त्याचा फोलपणा माझ्या लक्षात आला आणि मी अधिकाधिक अंतर्मुख बनत गेलो. तो माझा स्वभावच बनला. त्यामुळं माझे मित्र, चाहते यांची संख्या नेहमीच अत्यंत मर्यादित राहिली. पण जे मिळाले ते मात्र शंभर नंबरी सोनं होतं.

## माझ्या साहित्याचं वेगळेपण

माझ्या जीवनातल्या वेगळेपणाचं प्रतिबिंब माझ्या साहित्यात उमटणं अगदी स्वाभाविक होतं. ज्याप्रमाणं मी कुठल्याही पक्षाला, विचारधारेला कायमचा चिकटून राहिलो नाही, त्याप्रमाणं माझं साहित्यही एकाच चाकोरीतून वाहत राहिलं नाही. सामान्यत: कोणताही साहित्यिक स्वत:च्या आवडीचा एखादा साहित्यप्रकार निवडतो आणि जन्मभर त्याच प्रकारात रमून जातो. त्यामुळं त्या विशिष्ट प्रकारात तर त्याची दखलही तत्परतेनं घेतली जाते. माझ्या बाबतीत तसं घडलं नाही. त्यामुळं एक धड ना, भाराभार चिंध्या अशी माझ्या लिखाणाची स्थिती झाली. १९४० पासून मी लिखाणाला सुरुवात केली. परंतु पुस्तकरूपानं माझं लिखाण प्रकाशित होण्यास १९४३ पासून प्रारंभ झाला. त्यानंतरच्या सुमारे साठ वर्षांत माझी २०० लहान-मोठी पुस्तके आणि सुमारे २ हजार स्फुट लेख प्रकाशित झाले. त्यातील बहुसंख्य वैचारिक स्वरूपाचे होते. मी काही लोकप्रिय लेखक नव्हे. कारण केवळ खपावर लक्ष ठेवून खपेल ते लिहायचं, हे माझ्या स्वभावाला मानवण्यासारखं नव्हतं. माझी काही जीवनमूल्य होती. काही श्रद्धा होत्या. त्यांच्याशी प्रतारणा करून मी कधीही लिखाण केलं नाही. आपल्या प्रामाणिक मतांच्या अभिव्यक्तीचं साधन म्हणूनच मी लिखाण केलं. त्यामुळं माझा वाचक वर्ग अत्यंत निवडक व मर्यादित राहिला. माझी पुस्तकं अत्यंत कमी संख्येनं खपतात. तरीही मला कधी प्रकाशकांची उणीव भासली नाही. पंजाब व आसामपासून केरळ व तामिळनाडूपर्यंत ७५हून अधिक प्रकाशकांनी माझी पुस्तकं व लेख प्रसिद्ध केले. माझ्या प्रकाशित पुस्तकांपैकी जवळजवळ निम्मे अनुवाद व शब्दकोश आहेत. त्यांपैकी मी स्वत: केलेल्या अनुवादांची संख्या ७५ व इतरांनी कन्नड, इंग्रजी, मल्याळम्, असमीया, गुजराती, तेलुगु, उर्दू वगैरे भाषांत केलेल्या अनुवादांची संख्या १२ आहे. लेखनावर उपजीविका करण्याचं ठरल्यावर हुकमी लेखनाचा प्रकार म्हणून अनुवाद हा अत्यंत उपयुक्त असल्याचं माझ्या लक्षात आलं. शब्दकोशांची निर्मिती हा माझा एक आवडता छंद आहे. १९४३ पासून १९९७ पर्यंतच्या कालखंडात हिंदी, मराठी व उर्दू या भाषांचे लहान-मोठे असे माझे १० शब्दकोश प्रकाशित झाले. त्यापैकी 'अभिनव शब्दकोश' या हिंदी-मराठी शब्दकोशाची सातवी आवृत्ती सध्या चालू आहे. उर्दू-मराठी आणि उर्दू-मराठी-हिंदी या शब्दकोशांनाही वाचकांची अखंड मागणी असते. डॉ. कृ. पां. कुलकर्णी यांच्या 'मराठी व्युत्पत्तिकोशा'च्या तिसऱ्या आवृत्तीच्या पुरवणीचं संपादनही मी केलं आहे. माझ्या बहुभाषाकोविदत्वाचा मला त्या कामी चांगला उपयोग झाला.

## अनुवादांचं वेगळेपण

अनुवादांपैकी रामानंद सागर यांच्या 'और इन्सान मर गया' या उर्दू कादंबरीचा मी केलेला 'आणि माणसांचा मुडदा पडला' हा अनुवाद विशेष लोकप्रिय ठरला. त्याची पाचवी आवृत्ती प्रकाशनाच्या मार्गावर आहे. त्याखेरीज 'कुर्रतुलऐन हैदर' या प्रख्यात उर्दू-इंग्रजी लेखिकेच्या ज्ञानपीठ पुरस्कार प्राप्त 'आग का दर्या' या कादंबरीचा 'आगीचा दर्या' हा अनुवाद आणि तारा शंकर बंद्योपध्याय यांच्या 'आरोग्य निकेतन' या ज्ञानपीठ पुरस्कारप्राप्त कादंबरीचा त्याच नावाने केलेला मराठी अनुवाद महत्त्वाचे होते. श्रीलाल शुक्लांच्या 'राग दरबारी'च्या मराठी अनुवादाची दुसरी आवृत्तीही निघाली. साहित्य अकादमी, भारतीय अनुवाद परिषद (दिल्ली) वगैरे काही संस्थांनी याच अनुवादाबद्दल मला पुरस्कार दिले. पण त्याचा मला फारसा आनंद झाला नाही. कारण हिंदीतून मराठीत अनुवाद करणं तसं सोपं होतं. त्या मानानं उर्दू किंवा बंगालीतून अनुवाद करणं हे अधिक कौशल्याचं काम होतं. अर्थात महर्षि दयानंद सरस्वती यांच्या 'सत्यार्थ प्रकाश' या ६४० पृष्ठांच्या अवघड हिंदी ग्रंथाचं भाषांतर करताना माझ्या सहनशक्तीची कसोटीच लागली होती, हा भाग वेगळा! मराठीतून हिंदीत अनुवाद करणंही तसं कष्टाचंच काम असतं. त्यामुळं धर्मानंद कोसंबी यांच्या 'भगवान् बुद्ध' या चरित्रग्रंथाचा व 'पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म' या वैचारिक धार्मिक ग्रंथाचा हिंदीत अनुवाद करणंही पुष्कळच कष्टाचं ठरलं. खलील जिब्रान हा मुळात अरबी भाषेचा लेखक. त्याच्या बहुतेक सर्व अरबी पुस्तकांचे उर्दूत अनुवाद झाले आहेत. त्यावरून मी सात पुस्तकांचे मराठीत अनुवाद केले. एवढंच नव्हे तर जिब्रानचं जीवन आणि साहित्य यांची ओळख करून देणारा २२५ पृष्ठांचा ग्रंथही तयार केला. त्याची दुसरी आवृत्तीही निघाली. अशा प्रकारचा जिब्रानविषयक ग्रंथ अन्य भारतीय भाषांत नसावा! याखेरीज जलालुदीन रूमी आणि सआदत हसन मंटो यांच्या कथांचे संग्रहही मी तयार केले. त्यांच्या वेगळेपणामुळं ते वाचकांना विशेष आवडले. मराठी-हिंदी-उर्दू, हिंदी-मराठी, हिंदी-उर्दू, गुजराती-मराठी, गुजराती-हिंदी, बंगाली-मराठी, बंगाली-हिंदी, कोकणी-हिंदी, इंग्रजी-हिंदी, इंग्रजी-मराठी असे १०-१२ प्रकारचे अनुवाद मी केले. इतक्या प्रकारचे अनुवाद बहुधा इतर कोणी केले नसावेत.

## ललित साहित्यातील फेरफटका

अनुवादाच्या कामातून सवड मिळेल तेव्हा मी कथा, कादंबऱ्या, कविता, लघुनिबंध यांसारख्या ललित साहित्याचीही निर्मिती करीत होतो. या कालखंडात माझे ४ कथासंग्रह, ४ कादंबऱ्या, २ लघुनिबंध संग्रह, एक कवितासंग्रह आणि प्रवास वर्णनांचे १८ लहान मोठे ग्रंथ प्रसिद्ध होत राहिले. त्या त्यावेळी त्याची थोडीफार दखल समीक्षकांनी घेतलीही. पण जसजसा एकेक वाङ्मयप्रकार मला अभिव्यक्तीसाठी अपुरा वाटू लागला. तसतसा मी दुसऱ्या वाङ्मयप्रकारांकडे वळत गेलो. त्यामुळं माझ्या कोणत्याही एका वाङ्मयप्रकाराकडे वाचक आणि समीक्षक यांचं लक्ष केंद्रित झालं नाही. वस्तुतः 'विस्कटलेलं घरटं' ही कादंबरी प्रकाशित झाल्यानंतर त्यावर थोडीफार चर्चाही झाली. कारण महाराष्ट्रातल्या ब्राह्मण-

ब्राह्मणेतरांच्या संबंधांचा, किंवहुना संघर्षाचा १९२० ते १९५७ या काळातला गांधी हत्येनंतरची जाळपोळ व कूळ कायदा यांच्या परिणामांच्या आधारे नि:पक्ष व निर्भय आढावाच त्यात घेण्यात आला होता. तिचा हिंदीत व इंग्रजीत अनुवादही प्रकाशित झाला आणि बऱ्याच काळानंतर म्हणजे १९९६ साली तिची दुसरी आवृत्तीही निघाली. पण एकूण मराठी कादंबरी-साहित्याचा विचार करताना या कादंबरीची दखल घ्यावी असं कुणाला वाटलं नाही. 'तुरुंगातले दिवस' ही खऱ्या अर्थानं कादंबरी नाही. तो खरा तर कारावासाचा अनुभव सांगणारा आत्मवृत्तांतच आहे. एक प्रेमप्रकरणही मी नमूद केलं होतं. त्यामुळं ती कादंबरी समजली गेली. या संदर्भात एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. स्वातंत्र्यलढ्यामध्ये मी दोन वर्षं तुरुंगात काढली होती. पण पुढं मी स्वत:ला स्वातंत्र्यसैनिक म्हणवून मिरवण्याचं नाकारलं; आणि स्वातंत्र्यसैनिकांना मिळणाऱ्या निवृत्तीवेतन, मानपत्र, प्रवास सवलती वगैरे गोष्टीही घेतल्या नाहीत. त्यामुळं मी कधीकाळी स्वातंत्र्यसैनिक होतो याचाच मला आणि लोकांना विसर पडला. मातृभूमीच्या सेवेबद्दल पैसे घेणं म्हणजे स्वत:च्या आईची सेवा करण्याबद्दल मजुरी घेण्यासारखं आहे असं मी समजतो. शिवाय या साऱ्या प्रकरणात अनेक प्रकारचा भ्रष्टाचार होत असल्याचंही माझ्या कानांवर आलं. अत्यंत सुस्थितीत असलेल्या तथाकथित स्वातंत्र्यसैनिकांना जनतेच्या करातून स्वत:ला मेहनताना घेत असल्याचं पाहून मला त्या एकूण प्रकाराचीच घृणा आली. त्यामुळे सरकारला व लोकांना मी स्वातंत्र्यसैनिक असल्याचा विसर पडला, याचं मला बरंच वाटलं. माझ्या बहुतेक कथा आणि कादंबऱ्या एखाद्या समस्येचं विश्लेषण करणाऱ्या आहेत. त्या अर्थानं डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर आणि प्रा. वा. म. जोशी यांची परंपरा मी माझ्या कुवतीप्रमाणं पुढं चालविली, असं म्हणता येतं. परंतु एव्हाना मराठी वाचक आणि समीक्षक यांच्या आवडीनिवडी बदलल्यामुळं त्या वारशाची दखल घेण्याची गरजच कुणाला वाटली नसावी, असं दिसतं!

## प्रवासवर्णनांचा वेगळेपणा

अलीकडच्या काळात प्रवासवर्णन हे विविध प्रदेश आणि तिथल्या जनतेची परिस्थिती यांची माहिती देण्याचं एक उत्कृष्ट साधन असतं, याचाच मोठमोठ्या लोकांना विसर पडला; आणि त्यांनी प्रवासवर्णन हा ललित साहित्याचाच एक हलकाफुलका प्रकार बनवून टाकला. त्यामुळं त्यांची प्रवासवर्णनं तुफान लोकप्रिय झाली; आणि माझ्या प्रवासवर्णनांकडे पूर्णपणे दुर्लक्ष केलं गेलं. वस्तुत: काश्मीर, पूर्वांचल प्रदेश, कूर्ग इत्यादी भारतीय प्रदेश आणि जपान व अरबस्तान हे परदेश यांच्याविषयीची माझी प्रवासवर्णनं खूपच माहितीपूर्ण होती. स्थानिक जनमानसाची ओळख त्यांतून होत होती. पण वाचक व समीक्षक यांना त्यांचं महत्त्वच समजलं नाही.

## सगळंच साहित्य हे आत्मचरित्र

माझ्या लिखाणाच्या बाबतीतलं एक वैशिष्ट्य लक्षात घेण्यासारखं आहे. त्यात काल्पनिक असं काही नसून जीवनात आलेल्या स्वानुभवाचं ते वस्तुनिष्ठ कथन आहे. 'ग्यानबाचा गांधी

बाबा', 'भारतीय मुसलमान', 'वीर शिवाजी' व 'महाराष्ट्र के समाजसुधारक' (हिंदी), 'जिब्रान खलील जिब्रान', 'महर्षी दयानंद सरस्वती' यांसारख्या चरित्रात्मक व वैचारिक पुस्तकात आत्मकथनाचा भाग फारसा नाही. परंतु त्यातही स्वत:च्या अनुभवांचा खूप उपयोग मी केला आहे. 'उलगाउलग', 'विचारयात्रा' व 'अखेरचं पर्व' ही तर माझी तीन आत्मचरित्रंच आहेत. त्यांमध्ये जसे स्वानुभव आहेत तशी त्या त्या काळाची प्रत्यक्ष वर्णनंही आहेत. 'कस्तुरीचे कण' (भाग १ व २) मध्ये ज्यांच्याशी माझा घनिष्ठ संबंध आला अशा २० श्रेष्ठ व्यक्तीविषयींचे माझे स्वानुभवच शब्दबद्ध आहेत. 'विचारयात्रा'विषयी तर्कतीर्थ म्हणतात, " 'विचारयात्रा' हे एक प्रकारचे आपले आत्मचरित्रच आहे. असे चरित्र अजून कोणी लिहिलेले नाही. हे या 'विचारयात्रे'चे वैशिष्ट्य आहे." 'विचारयात्रा' ही एकप्रकारे प्रातिनिधिक स्वरूपाची आहे. अनेक आधुनिक हिंदू मनांची अशीच विचारयात्रा घडली आहे. परंतु ती कोणी शब्दबद्ध केलेली नाही.

असा हा माझ्या लिखाणाचा आढावा! त्याला मी साहित्यसेवा म्हणत नाही. कारण उपजीविकेचं साधन म्हणून केलेले ते लिखाण आहे. नाटक, सिनेमा, टिंगलटवाळी ही मराठी वाचकांची अलीकडच्या काळातली अत्यंत आवडती क्षेत्रं. त्यांचं आकर्षण मला कधी वाटलं नाही. विज्ञान साहित्यानंही मला प्रभावित केलं नाही. म्हणून मी तसा वेगळा व एकाकीच राहिलो. 'पथिक' या माझ्या १९४० साली लिहिलेल्या कवितेत मी म्हटलं होतं. "वाट अपुली चालताना धीर का खचतो तुझा? चालणे तुज एकल्याला, ना मिळे साथी दुजा!" अशी ही ६० वर्षांची वाटचाल. आजच्या सन्मानानं तिचं सार्थक झालं. समाधान वाटलं. त्याबद्दल सर्व संबंधितांना मन:पूर्वक धन्यवाद!

■

श्रीपाद जोशी
'श्रीरघुवंश', डॉ. केतकर मार्ग, पुणे ४. फोन : ५४३७४४१

---

## स्वागत

- ❑ **गंज / टेक ओव्हर :** संजीव लाटकर, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १३८.
- ❑ **बालकाण्ड :** ह. मो. मराठे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ३३२.
- ❑ **पु. ल. नावाचे गारूड :** मुकुंद टांकसाळे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २०६.
- ❑ **कुलवृत्तांत २००० :** साठे-साठ्ये, गोंधळेकर, गोवंडे व धारू या कुलपरिवाराचा कुलवृत्तांत, संपादक — सुरेश दत्तात्रय साठे,
  प्रकाशक — जयप्रकाश साठे, पुणे, पृष्ठे ९५०.
- ❑ **धोंडूमामा साठे — जीवनकार्य :** सुरेश दत्तात्रय साठे, प्रकाशक — जयप्रकाश साठे, पृष्ठे ६४.
- ❑ **चांगदेव चतुष्ट्यसंमाषी :** संपादक — राजन गवस, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ४९४.
- ❑ **दलित कवितेतील नवे प्रवाह :** महेंद्र भवरे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे २२०.
- ❑ **राहिले दूर घर माझे :** शफायत खान, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ७८.
- ❑ **समाज भाषा विज्ञान :** रमेश वरखेडे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ८०.

---

# साक्षेपी समीक्षक : प्रा. श्री. ना. बनहट्टी

(जन्म: ६-३-१९०१; निधन: २२-४-१९७५)

❖

डॉ. गं. ना. जोगळेकर

❖

१९२५ ते १९७५ या पन्नास वर्षांच्या कालखंडात मराठीत समीक्षकांची एक मोठी मालिका निर्माण झालेली दिसते. श्री. के. क्षीरसागर, रा.श्री. जोग, पु. ग. सहस्रबुद्धे, द. के. केळकर, ग. त्र्यं. देशपांडे, शं. दा. पेंडसे, वा. ल. कुलकर्णी या किंवा यांसारख्या कितीतरी समीक्षकांचे कर्तृत्व या कालखंडात बहरले. या मेळाव्यात प्रा. श्री. ना. बनहट्टी हे आपल्या वेगळेपणामुळे लक्षणीय ठरलेले व्यक्तिमत्त्व आहे. दि. के. बेडेकर, वि. भि. कोलते, के. नारायण काळे, ना. गो. नांदापूरकर, हैदराबादचे चिं. नी. जोशी हे थोड्याफार अंतराने याच काळातले समीक्षक. एकाच काळात संख्येने इतके समीक्षक असल्यावर प्रत्येकाला आपले वेगळेपण दाखविणे आवश्यकच होते. त्यामुळे कुणी प्राचीन काव्यशास्त्र, कुणी पाश्चात्त्य समीक्षा, कुणी संत साहित्य तर कुणी विशिष्ट वाङ्मयप्रकार यात विशेषीकरण साधलेले दिसते.

प्रा. श्रीनिवास नारायण बनहट्टी (जन्म: ६ मार्च १९०१) हे नाव प्रथमत: लक्ष वेधून घेते ते कर्नाटकी आडनावामुळे. महाराष्ट्र आणि कर्नाटक या शेजारच्या प्रांतांमध्ये अनेक बाबतींत सारखेपण आहे. त्यांत गावावरून पडलेले आडनाव ही एक समान बाब आहे. फरक इतकाच की महाराष्ट्रात गावाच्या उल्लेखानंतर 'कर' हा प्रत्यय लागून आडनाव बनते तर कर्नाटकात गाव हेच आडनाव म्हणून वापरले जाते. (जसे विनायक कृष्ण गोकाक, बा. कृ. गलगली याच पद्धतीने बेट्टगिरी, लोकूर, कित्तूर, लक्ष्मेश्वर इ. गावांची नावे हीच कन्नड लेखकांची आडनावे आहेत.) बनहट्टी हे काही फार प्रसिद्ध गाव नव्हे. आजच्या बागलकोट जिल्ह्यातले ते एक विणकरांचे गाव आहे. या गावातून काही पिढ्यांपूर्वी कुणी कुलकर्णी महाराष्ट्रात आले ते त्या गावावरून ओळखले जाऊ लागले तेच हे बनहट्टी. हे आडनाव आज मराठी साहित्यात काही पिढ्यांची साहित्यिक परंपरा असल्यामुळे वाचकांच्या परिचयाचे झाले आहे.

प्रा. श्री. ना. बनहट्टी यांना पांडित्याचा व लेखनाचा वारसा त्यांच्या वडिलांकडून मिळाला. श्री. नारायण दासो बनहट्टी हे डेक्कन कॉलेजमधील संस्कृत ग्रंथसंग्रह विभागाचे प्रमुख होते. 'असिस्टंट प्रोफेसर' हा त्यांचा दर्जा होता. संस्कृत पंडित असलेले हे बनहट्टी प्राचीन भारतीय परंपरेचे अभिमानी होते आणि लो. टिळकांचे जवळचे स्नेही होते. १८९७ मध्ये टिळक तुरुंगात असताना त्यांना पाहिजे असलेले ग्रंथ श्री. बनहट्टींकडून मिळत असत. नारायण दासो बनहट्टी यांनी उद्भटाच्या 'काव्यालंकार सारसंग्रहा'चे संपादन करून त्याला इंग्रजीत प्रस्तावना लिहिली. त्यामुळे त्यांचे नाव संस्कृत अभ्यासकांच्या परिचयाचे होते. मराठी शुद्ध लेखनासंबंधीच्या वादामुळे त्यांचे लेखन मराठी वाचकांपुढे आहे. न. चिं. केळकरांनी १९२८

मध्ये लो. टिळक चरित्राच्या तिसऱ्या खंडामध्ये अनुच्चारित अनुस्वारांना फाटा दिला. या त्यांच्या कृतीस विरोध करण्यासाठी जे पुढे सरसावले त्यात नारायण दासो वनहट्टी प्रमुख होते. त्यांनी 'लोकशिक्षण' मासिकात 'मराठी भाषेची लेखन पद्धती' या शीर्षकाचे सात लेख लिहिले (त्यांची नंतर पुस्तिकाही प्रसिद्ध झाली.) १९२९-३० मध्ये म. सा. परिषदेने शुद्ध लेखन-नियमांसाठी जी समिती नियुक्त केली तिच्यात जुन्यापुराण्या मताचे प्रतिनिधी म्हणून ना. दा. बनहट्टी यांचा समावेश झाला होता. या समितीला काही सविस्तर सूचना करणारे पत्र लिहिल्यामुळे श्री. ना. बनहट्टी यांनाही या समितीत घेण्यात आले होते. एकाच समितीत पिता-पुत्र दोघेही असण्याची ही एक अपवादात्मक घटना म्हणता येईल.

श्री. ना. बनहट्टी यांचा जन्म जरी पुण्यास झाला असला तरी त्यांचे शालेय शिक्षण (वडिलांची बदली झाल्यामुळे) मुख्यत: जळगावला झाले. डेक्कन कॉलेजमधून ते संस्कृत आणि मराठी हे विषय घेऊन एम. ए. झाले. दोन वर्षे त्यांनी एलफिन्स्टन महाविद्यालयात काम केले खरे; पण १९२७ मध्ये नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयात त्यांची मराठीचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. तेव्हापासून १९४५ पर्यंत नागपूर हेच त्यांचे कार्यक्षेत्र राहिले.

प्रा. बनहट्टी यांच्या जीवनात म्हणण्यासारखे चढउतार नाहीत. नागपूर विद्यापीठातील मराठीचे पहिले प्राध्यापक म्हणून त्यांना महत्त्व होते आणि विदर्भातील विद्यार्थ्यांच्या सुरुवातीच्या पिढ्या त्यांच्या हाताखाली तयार झाल्या. सागरचे डॉ. दा. ल. अडोणी, जबलपूरचे डॉ. गो. मो. रानडे आणि नागपूरचे मा. गो. देशमुख हे त्यांचे सर्व परिचित विद्यार्थी म्हणून मान्यता पावले आहेत. त्यातही 'मराठीचे साहित्यशास्त्र' हा डॉ. मा. गो. देशमुख यांचा संशोधन ग्रंथ उलटसुलट चर्चेचा विषय ठरला. प्रा. बनहट्टी यांना आधुनिक वाङ्मयाचे वावडे नव्हते; पण ते विशेषत्वाने रमले ते ज्ञानेश्वरांपासून मोरोपंतांपर्यंतच्या प्राचीन कवींच्या अभ्यासात. त्या काळातील विद्यार्थ्यांचे संस्कृतचे अध्ययन एक आवश्यक विषय म्हणून होत असे. वडिलांच्या मार्गदर्शनामुळे आणि डेक्कन कॉलेजमधील परंपरेमुळे त्यांची संस्कृतमध्ये विशेष गती होती. या अध्ययनाचा त्यांना मोरोपंताविषयक ग्रंथलेखनात चांगलाच उपयोग झाला.

विद्यार्थीदशेपासूनच प्रा. बनहट्टींच्या मनावर विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या जीवनकार्याचा आणि निबंधलेखनाचा प्रभाव पडला होता. जळगावला विद्यार्थी असताना योगायोगाने त्यांच्या वाचनात निबंधमालेचे खंड आले. प्रौढ आणि शैलीदार लेखनाचा त्यांना परिचय झाला आणि विष्णुशास्त्री हेच आपले आदर्श असे त्यांनी ठरविले. कालांतराने निबंधमालाकारांच्या विवेचनाला दुसरीही बाजू आहे आणि तीही विचारात घेतली पाहिजे हे त्यांना पटले; पण तरीही शास्त्रीबुवांबद्दलचा आदर कमी झाला नाही. मुख्यत: लेखन आणि संस्थात्मक कार्य हेच प्रा. बनहट्टी यांचे उद्दिष्ट राहिले. प्रा. बनहट्टी यांनी आयुष्यभर ज्ञानसाधना केली, ज्ञानेश्वरीच्या पाठशुद्ध आवृत्तीचा मोठा प्रकल्प हाती घेतला (तो पूर्ण होणे त्याच्या वार्धक्यामुळे शक्य नव्हते!) आणि ते जेथे असतील तेथील संस्थात्मक कार्याची धुरा त्यांनी वाहिली. पुण्यात आणि विशेषत: मुंबईत जेव्हा 'नाट्यमन्वंतर' घडत होते. त्या काळात त्यांनी नागपूरला अभिनव नाट्यमंदिर ही प्रायोगिक संस्था स्थापन करून, स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीच करायच्या



अनुक्रमणिका

ही त्यावेळी अजून न रुजलेली बाब प्रत्यक्षात आणली. विदर्भातील सुशिक्षित समाजाच्या मनात नाट्याची अभिरूची निर्माण केली. अनेक जुन्या व नव्या छोट्या-मोठ्या नाटकांचे दिग्दर्शनही ते करीत. नाटककार नाना जोग, पुरुषोत्तम दारव्हेकर अशा अनेकांच्या मनात त्यांनी रंगभूमीचे प्रेम रुजविले. मराठी रंगभूमीच्या स्थापनेला १९४३ मध्ये शंभर वर्षे पूर्ण होतात हे स्मरून त्यांनी 'शतसांवत्सरिक उत्सव' सांगलीस झाला पाहिजे या मताचा महाराष्ट्रभर प्रचार केला. या उत्सवाचे ते कार्याध्यक्ष होते. सांगलीचा हा सोहळा किती ऐतिहासिक महत्त्वाचा ठरला आणि मराठी नाट्यसृष्टीला नव्याने चालना कशी मिळाली हा इतिहास सर्व नाट्यप्रेमींना माहीत आहे. या ऐतिहसिक घटनेची मूळ प्रेरणा प्रा. बनहट्टींची होती हे मात्र पुष्कळांना माहीत नसते. सांगलीच्या या उत्सवापाठोपाठ डॉ. अ. ना. भालेराव यांच्या कल्पक व कष्टाळू नेतृत्वामुळे मुंबईत व इतरत्र नाट्य महोत्सव सुरू झाले. (डॉ. भालेराव यांच्याही जन्म शताब्दीचे हे वर्ष आहे.) अण्णासाहेब किर्लोस्करांच्या ३१ ऑक्टोवर १८८० रोजी पुण्याच्या आनंदोद्भव नाट्यगृहात 'संगीत शाकुंतल' नाटकाचा पहिला प्रयोग झाला. 'केसरी' मधून या अभिनव प्रयोगाचे स्वागत विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी पाच लेख लिहून केले होते. किर्लोस्करांनी समाजाला 'सभ्य करमणूक' मिळवून दिली यासाठी त्यांचे विष्णुशास्त्र्यांनी अभिनंदन केले होते. चिपळूणकरांपासून लेखन कार्याची प्रेरणा घेणाऱ्या प्रा. बनहट्टी यांनी शतसंवत्सरिक उत्सवाला चालना देऊन एक पाऊल पुढे टाकले असे म्हटले पाहिजे.

चिपळूणकरांनी निबंधमाला सुरू करून मराठी साहित्यात क्रांती केली. ईप्सित कार्य झाल्यावर त्यांनी स्वत:च निबंधमाला बंदही केली. त्यानंतर टिळक-आगरकर इ. च्या सहकार्यनेच १९८१ मध्ये 'केसरी' चे प्रकाशन सुरू केले. केसरीमध्येही त्यांनी वेळोवेळी अनेक लेख लिहिले. मृत्युपूर्वी बरोबर एक महिना आधी त्यांनी आयुष्यातला शेवटचा लेख लिहिला. लेखाचे शीर्षक होते 'देशोन्नती'!

नियतकालिके चालवून समाजात जागृती करणे, अनेकांना लिहिण्याची प्रेरणा देणे हे चिपळूणकरांचे कार्य प्रा. बनहट्टी यांनीही पार पाडले. 'विहंगम' हे मासिक आणि 'समाधान' हे साप्ताहिक सुरू करून या क्षेत्रात उल्लेखनीय कार्य केले. विदर्भात दीर्घ काळ टिकलेली नियतकालिके अगदीच मोजकी आहेत, त्यामुळे प्रा. बनहट्टी यांची नियतकालिके अल्पायुषी ठरली यात काही आश्चर्य नाही. आपले नित्याचे अध्यापनकार्य सांभाळून त्यांनी हे लोकशिक्षण केले हे महत्त्वाची कामगिरी आहे. 'निबंधमाले'नंतरचे पुढचे पाऊल म्हणून विष्णु गोविंद विजापूरकर या इतिहासाचार्य राजवाड्यांच्या अगदी समकालीन विचारवंतांनी १८९४ मध्ये 'ग्रंथमाला' नावाचे मासिक सुरू केले ते १९०७ पर्यंत चालले. स्वतंत्र व भाषांतरित असे वैचारिक ग्रंथ या मासिकातून प्रसिद्ध होत असत. इतिहासाचार्य राजवाडे, ल. रा. पांगारकर, ल. कृ. चिपळूणकर, ज. स. करंदीकर अशा तत्कालीन विद्वानांचे ग्रंथ या ग्रंथमालेतून प्रसिद्ध झाले. वि. ल. भावे यांचा गाजलेला 'महाराष्ट्र-सारस्वत' हा ग्रंथ म्हणजे मुळात ग्रंथमालेतून प्रकाशात आलेले शंभर पृष्ठांचे एक छोटेखानी पुस्तक होते. 'निबंधमाला'कारांच्या पठडीतल्या विजापूरकरांचे कामच प्रा. बनहट्टी यांनी पुन्हा हाती घेतले. 'नवभारत ग्रंथमाला' हे आपल्या

उपक्रमाचे नाव योजताना त्यांची निश्चित भूमिका होती. स्वातंत्र्याची चळवळ जोमात सुरू असलेल्या ह्या काळात नवभारताची उभारणी मौलिक विचारांच्या पायावर झाली पाहिजे असे त्यांना वाटत होते. त्यांनी स्वतःच 'ज्ञानोपासना आणि भारतीयांची कर्तव्ये' हे पुस्तक लिहून आपल्या कार्याची दिशा स्पष्ट केली. ही ग्रंथमाला चालविण्यात त्यांचे संघटनाचातुर्यही दिसून येते. कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे (भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न), आचार्य धर्मानंद कोसंबी (भगवान बुद्ध), ज्ञानकोशकार डॉ. केतकर (भारतीय समाजशास्त्र), म. म. वा. वि. मिराशी (कालिदास), डॉ. शं. दा. पेंडसे (महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास) हे आणि यांसारखे अन्य ग्रंथ म्हणजे मराठीच्या ज्ञानभांडारात या अधिकारी अभ्यासकांनी किती मोलाची भर घातली आहे याची कल्पना सहज येण्यासारखी आहे. हे ग्रंथप्रकाशन सुलभ होण्यासाठी प्रा. बनहट्टी यांनी स्वतःचे मुद्रणालय सुरू केले आणि त्यातूनच 'सुविचार' प्रकाशन मंडळ ही संस्था (नागपूर व पुणे) नावारूपाला आली. (संस्थांचे नामकरण करण्यामागची भूमिका येथेही स्पष्ट होते.)

बऱ्याच लेखकांचे प्रारंभीचे लेखन अनुकरणात्मक आणि अभिनिवेशपूर्ण असते. कालांतराने त्या लेखनाचे स्वरूप बदलते. प्रा. बनहट्टींच्या बाबतीत हा प्रकार आढळत नाही. ऐन पंचविशीत त्यांनी 'लो. टिळकांची धर्मविषयक मते' या विषयावर विस्तृत लेख लिहिला. त्यातील प्रौढ भाषा, वर्ण्य विषयाचा सांगोपांग अभ्यास आणि सुस्पष्ट प्रतिपादन यामुळे केसरीचे संपादक न. चिं. केळकर यांना तो पसंत पडला आणि 'केसरी'तर्फे प्रकाशित झालेल्या संपादित ग्रंथात त्याचा समावेश झाला. केळकरांनी प्रा. बनहट्टी यांच्या नंतरच्या लेखनाचेही कौतुक केले. एका अधिकारी लेखकाला आपले लेखन पसंत पडते या जाणिवेने प्रा. बनहट्टी यांचा उत्साह वाढला असणार, पण याची त्यांनी कधी प्रौढी मिरवली नाही हे उल्लेखनीय आहे.

श्री. ना. बनहट्टी हे नाव जाणकार अभ्यासकांना मोठ्या प्रमाणावर माहित झाले ते त्यांच्या 'मयूरकाव्य विवेचन' या मोरोपंतविषयक ग्रंथामुळे. स्वतंत्र ग्रंथ लिहिण्यासाठी त्यांनी प्रथम मोरोपंत हा विषय निवडावा हेही लक्षणीय आहे. 'निबंधमाले'तून विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी सात निबंध लिहून मोरोपंतांसंबंधी विस्तृत विवेचन केले होते. चिपळूणकरांच्या गाजलेल्या निबंधांपैकी हा निबंध आहे. न्या. रानडे, दादोबा पांडुरंग, परशुरामपंततात्या गोडबोले इ. आधीच्या अभ्यासकांनी मोरोपंतांबद्दल मतप्रदर्शन करताना त्यांना त्यांच्या क्लिष्ट भाषेबद्दल आणि केकावलीतून परमेश्वराशी जास्त सलगी केल्याबद्दल दूषणे दिली होती. इतर काहींची मजल तर मोरोपंत हे केवळ भाषांतर करणारे शब्दजुळारे कवी आहेत अशी त्यांची संभावना करण्यापर्यंत गेली होती. अशा सर्व आक्षेपकांना सडेतोड उत्तर निबंधमालाकारांनी देऊन या कवीची प्रशंसा केली. त्यामुळे नंतर काही काळ अभ्यासकांनी दुसरे टोक गाठले आणि मोरोपंतांच्या प्रशंसकांचा एक वर्ग निर्माण झाला. त्यात मुख्यतः वि. ल. भावे आणि ल. रा. पांगारकर यांचा समावेश होतो. 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथात वि. ल. भावे यांनी प्राचीन मराठीतील शेवटचा मोठा कवी म्हणून मोरोपंतांची वाखाणणी केली. पांगारकरांनी तर मोरोपंतांवर स्वतंत्र ग्रंथ लिहून मोरोपंतांच्या कवित्वाची तपशीलवार चर्चा केली. नंतरच्या काळातही या



अनुक्रमणिका

कवीबद्दल उलटसुलट प्रतिक्रिया व्यक्त होत राहिल्या. प्रा. बनहट्टींचे समकालीन समीक्षक डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी 'मोरोपंत हे कवीच नव्हते' असे मत परखडपणे मांडले. या सर्व पार्श्वभूमीवर प्रा. बनहट्टी यांचे मोरोपंतविषयक लेखन वेगळे ठरते. त्यांनी या कवीची अवहेलनाही केलेली नाही, किंवा वारेमाप स्तुतीही केली नाही. अभ्यासकाच्या आणि संशोधकाच्या दृष्टीने त्यांना मोरोपंतांचे जे मूल्यमापन करावेसे वाटले ते त्यांनी समतोल आणि साधार पद्धतीने केले आहे. त्यामुळेच पंडिती काव्याच्या अभ्यासाला 'मयूर काव्य विवेचन' हा एक प्रमाणग्रंथ म्हणून अभ्यासकमान्य झाला आहे.

मोरोपंतांचे काव्य असे म्हणताच काही रूढ समज दिसून येतात. मोरोपंतांची भाषा अति क्लिष्ट आणि कृत्रिम आहे. मोरोपंतांची वर्णने पाल्हाळाने भरलेली असतात. मोरोपंत केवळ भाषांतर करणारे कवी आहेत, त्यांचे सर्व काव्य परभृत आहे, असे अनेक समज वाचकांच्या मनात असतात. अति संस्कृतप्रचुर भाषेमुळे मोरोपंतांचे काव्य क्लिष्ट होते, हे प्रा. बनहट्टी यांना मान्य आहे. पण त्यांच्या मते या दोषाचे कारण निर्दोष वृत्तरचनेचा कटाक्ष हे आहे. मात्र जेव्हा आर्या हे लवचीक मात्रावृत्त त्यांनी योजले, तेव्हा त्यांची सुबोध आणि प्रासादिक रचनाही पुष्कळ असल्याचे मान्य करावे लागते. (ल. रा. पांगारकर यांनीही असाच निष्कर्ष काढला आहे.) मोरोपंतांचे दोष त्यांच्या गुणांच्या अतिरेकातून कसे उद्‌भवतात, हे प्रा. बनहट्टी यांनी स्पष्ट केले आहे. स्फुट अभंगरचना करणारे संत सोडले तर बहुसंख्य प्राचीन मराठी काव्य रामायण-महाभारत आणि भागवत या आर्ष काव्यावर आधारलेले आहे हे अमान्य करता येत नाही. नरेंद्र - मुक्तेश्वरापासून वामन-श्रीधरपर्यंत सर्व प्रसिद्ध कवींनी हेच केले आहे. एकनाथी भागवत, भावार्थ रामायण आणि रुक्मिणी स्वयंवर या रचना करणारे संत एकनाथही या आक्षेपातून सुटू शकत नाहीत: तेव्हा एकट्या मोरोपंतांना धारेवर धरण्यात अर्थ नाही. उलट 'सीतागीत', 'सावित्री गीत' रचणारे मोरोपंत स्त्रीओवीसुद्धा सहजपणाने योजतात हे लक्षणीय आहे. 'संशयरत्नमाला', 'आर्याकेकावली', श्लोक केकावली', 'सन्मणिमाला' यांसारख्या त्यांच्या रचना सर्वस्वी स्वतंत्र आहेत. प्रा. बनहट्टी यांना मोरोपंतांना श्रेय द्यावेसे वाटते ते त्यांच्या संक्षेपचातुर्याबद्दल. एक लाखाहून अधिक श्लोक असलेल्या महाभारताला मोरोपंतांनी फक्त सतरा हजार आर्यांमध्ये आणले हे मोरोपंतांचे सामर्थ्य आहे असा प्रा. बनहट्टींचा अभिप्राय आहे. ''आर्या छंदे कथितो स्वल्पातचि आणितो कथा सारी'' ही प्रतिज्ञा मोरोपंतांनी खरी करून दाखविली आहे. आर्याभारत काव्य प्रभावी व्हायला मोरोपंतांचे समर्पक दृष्टान्त हेही त्यांनी दाखविले आहे.

'श्लोककेकावली' या मोरोपंतांच्या परिपक्व अवस्थेतल्या जवळजवळ शेवटच्या काव्याचीही प्रा. बनहट्टींनी मुक्तपणे प्रशंसा केली आहे. भक्ताची आर्तता व्यक्त करायला पृथ्वीसारखे प्रौढगंभीर वृत्त, शब्दालंकार आणि अर्थालंकारांची समुचित योजना, पुराणातल्या दृष्टान्तांचा मार्मिक उपयोग हे तर श्लोक केकावलीचे सर्वमान्य विशेष आहेत. प्रा. बनहट्टींनी या काव्यातील मोरोपंतांच्या एका कौशल्यावर विशेष भर दिला आहे. मोरोपंत चढत्या क्रमाने परमेश्वरापुढे युक्तिवादाच्या आधारे आत्मनिवेदन करतात, हे मोरोपंतांचे कौशल्य इथे विशेषत्वाने जाणवते.

एखाद्या कुशल वकिलाने विनतोडपणे आपली 'केस' मांडावी तो प्रकार इथे दिसून येतो हे प्रा. वनहट्टींचे निरीक्षण कुणालाही पटण्यासारखे आहे.

मोरोपंतांचा समग्र अभ्यास करताना त्यांची कोणती रचना कोणत्या क्रमाने झाली, हेही प्रा. बनहट्टी यांनी संशोधनपूर्वक दाखविले आहे. त्यांच्या काव्यनिर्मीतीचे पाच टप्पे मानता येतात. त्यातल्या चौथ्या टप्प्यात आर्याभारताची रचना झाली; तर शेवटच्या पाचव्या टप्प्यात त्यांनी मुख्यत: स्वतंत्र स्फुट रचना निर्माण केली. मोरोपंती काव्याच्या क्रमवारीने सिद्ध झालेल्या निर्मितीवद्दल प्रा. बनहट्टी यांचा निष्कर्ष कुणालाही मान्य होईल, असा आहे. प्राचीन काळातील फार थोड्या कवींवद्दल आधीचे काय, व नंतरचे काय हे सांगता आले आहे. त्यामुळेच प्रा. बनहट्टींचे संशोधन लक्षणीय ठरते.

प्रा. बनहट्टींच्या 'मयूर काव्य विवेचन' या पहिल्याच ग्रंथामुळे 'साहित्याचा सर्वांगीण परामर्श गंभीरपणे घेणारा अभ्यासक' अशी त्यांची प्रतिमा निर्माण झाली ती शेवटपर्यंत टिकून राहिली. विद्यापीठीय अभ्यासक्रम डोळ्यापुढे ठेवून त्यांनी अनेक संपादने केली, पण त्यात केवळ परीक्षार्थींना मार्गदर्शन करावे, ही वृत्ती नव्हती. मग 'आज्ञापत्र आणि राजनाती'सारखे शिवकालीन गद्य प्रकरण असो किंवा ज्ञानेश्वरीचा अध्याय असो; जिज्ञासू प्रौढ वाचकालाही अशा संपादनांचा लाभ होत असतो. प्राचीन साहित्याच्या संपादनात अनेक संपादकांच्या व्याकरणविषयक टीपा वेळ मारून नेण्यापुरत्या असतात. पण प्रा. बनहट्टी मात्र भाषाविचारही स्वतंत्रपणे सविस्तर मांडत असतात, असे दिसते.

प्रा. बनहट्टी यांनी आयुष्याच्या शेवटच्या सात-आठ वर्षांत संशोधनकार्याला वाहून घेतले होते. पुण्यात कायमचे राहण्यासाठी आल्यावर त्यांनी ज्ञानेश्वरीची पाठशुद्ध आवृत्ती तयार करण्याचा मोठा प्रकल्प हाती घेतला. 'भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिरा'तर्फे पन्नास वर्षांहून अधिक काळ महाभारताची पाठशुद्ध आवृत्ती तयार करण्याचे काम चालू होते. दहा-बारा संपादकांनी आपल्या जीवनातील अमूल्य वेळ त्यासाठी दिला, तरी हे काम चालूच होते. मराठी साहित्याचा मुकुटमणी असलेल्या ज्ञानेश्वरीची अशीच आवृत्ती तयार करण्याचे प्रा. बनहट्टींनी ठरविले. त्यासाठी 'ज्ञानोपासना निकेतन' या नावाची संस्थाही स्थापन केली. ज्ञानेश्वरीचा पहिला, सातवा व बारावा हे प्रतिशुद्ध अध्याय त्यांनी सिद्ध केले. हे प्रचंड काम अपूर्ण राहणे अटळच होते. याच काळात चिपळूणकरांच्या निबंधमालेची मनासारखी संपादित आवृत्ती ते निबंधमालेच्या शताब्दीच्या वेळी प्रकाशित करू शकले. 'विष्णुपदी' या अतिशय सूचक नावाने प्रकाशित झालेला हा ग्रंथ केवळ विष्णुशास्त्री चिपळूणकरांचेच नव्हे तर बनहट्टींचेही स्मारक म्हणता येईल. चिपळूणकरांच्या जन्मशताब्दीला म्हणजे १९५० मध्येच प्रा. बनहट्टी यांनी हा संकल्प केला होता. त्याची पूर्तता व्हायला मात्र १९७४ साल उजाडावे लागले. त्यांनी तीन खंडांत जे संपादन केले ते मात्र नमुनेदार आहे. आजच्या काळाच्या गरजेनुसार त्यांनी काही निबंधांचा संक्षेप केला आहे. त्यावरोवरच निवंधमालेनंतर १-१॥ वर्षांमध्ये त्यांनी 'केसरी'साठी जे निबंध लिहिले त्यांचाही विष्णुपदीत समावेश आहे. 'देशोन्नती' या चिपळूणकरांच्या शेवटच्या निवंधातून त्यांच्या शांत होत गेलेल्या मनोवृत्तीचे दर्शन घडते. या

विष्णुपदीच्या तिसऱ्या भागाला 'उपोद्घात' या शीर्षकाने प्रा. बनहट्टी यांनी जी प्रस्तावना जोडली आहे ती त्यांच्या समतोल विवेचनाची द्योतक आहे. चिपळूणकरांनी काही व्यक्तींवर शरसंधान केले त्याबद्दल त्यांना केवळ एकतर्फी नावे न ठेवता त्या त्या टीकेची कारणमीमांसा करण्याचा मार्ग प्रा. बनहट्टी यांनी अनुसरला आहे. लोकहितवादींचे आजचे समर्थक निबंध-मालेतील अधलीमधली वाक्ये उद्धृत करून विवेचनाची शिस्त न पाळता चिपळूणकरांना दूषणे कशी देतात ते त्यांनी स्पष्ट केले आहे. म. फुले यांच्यासंबंधी लिहिताना मात्र चिपळूणकर यांचे समर्थन न करता बनहट्टी यांनी त्यांच्या मर्यादा स्पष्ट केल्या आहेत. चिपळूणकरांची देशभक्ती, विद्वत्ता, त्यांनी केलेली राष्ट्रजागृती, त्यांची असामान्य साहित्यसेवा इत्यादी गुणांचा प्रा. बनहट्टी यांनी यथायोग्य गौरव केला आहे. एकंदरीने असे म्हणता येईल की, चिपळूणकरांचे भावडे गुणगान किंवा पक्षपाती टीका न करता केवळ नि:पक्षपाती अभ्यासच त्यांनी वाचकांपुढे ठेवला आहे.

मॉरिस कॉलेजमधून बनहट्टी १९४५ मध्येच निवृत्त झाले 'सरकारी नोकरीची बेडी' तोडून स्वातंत्र्याच्या चळवळीत भाग घेण्यासाठी त्यांनी असे केले, असे काही अभ्यासकांनी म्हटले आहे. ते तसे पटण्यासारखे नाही. एकतर त्यांनी चळवळीत प्रत्यक्ष असा भाग घेतल्याचे दिसत नाही. (ते शेवटपर्यंत खादी मात्र वापरीत असत.) त्यांच्या मनाविरुद्ध १९४४ मध्ये नागपूरहून अमरावतीला बदली झाल्याने त्यांनी राजीनामा दिला असावा. कारण त्याआधी अठरा वर्षे त्यांना ही बेडी कशी काचली नाही असा प्रश्न पडतो. यानंतर मात्र केवळ लेखन आणि संस्थात्मक कार्य हेच त्यांचे लक्ष्य राहिले. विदर्भ साहित्य संघाचे पुनरुज्जीवन, नियतकालिकांचे संपादन आणि स्फुट लेखन हे काम ते करीत राहिले. या काळात त्यांनी नाट्यविषयक संशोधन आणि समीक्षा यावर भर दिला आणि या क्षेत्रातला त्यांचा अधिकार सर्वमान्य झाला. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आकाशवाणीचे भाषा-सल्लागार म्हणून त्यांनी काम केले. भारतीय राज्यघटनेच्या मराठी अनुवाद समितीचे ते सदस्य होते. त्यांनी वेळोवेळी जे अनेक लेख विविध निमित्ताने लिहिले त्यांचेही संपादित संग्रह प्रकाशित झाले. वि. भि. कोलते, मा. गो. देशमुख, म. ना. अदवंत, द. रा. गोमकाळे अशा जाणकार अभ्यासकांचा या संपादनात पुढाकार होता. 'आकाशलहरी' या नावाचा त्यांचा भाषण-लेखसंग्रहही उल्लेखनीय आहे. नागपूर केंद्रावरून दिलेल्या भाषणांमध्ये विषयांचे वैविध्य आहेच पण लालित्यपूर्ण विवेचनामुळे हे लेख रोचकही झाले आहेत. प्रा. बनहट्टी हे सहसा वाद निर्माण करणारे समीक्षक नव्हेत. पण महाराष्ट्राचे केंद्र कोणते, याविषयी 'प्रतिभा' पाक्षिकात त्यांनी लिहिलेला लेख मात्र उलटसुलट चर्चेमुळे गाजला. त्यांच्या मते मुंबई हेच महाराष्ट्राचे केंद्र ठरते. त्यावेळी द. वा. पोतदारांसकट अनेकांनी हा मान पुण्याला दिला. अर्थात असे वाद कधीच न सुटणारे असतात. डॉ. केतकरांप्रमाणे स्वत: बनहट्टींनीही नागपूर सोडून कायमच्या वास्तव्यासाठी पुण्याची निवड केली आणि त्यांचे चिरस्थायी ठरलेले लेखन आणि संशोधनकार्य पुण्यातच झाले हे अर्थपूर्ण आहे!

मराठीत जशी नाटककारांची, तशी दर्जेदार नाट्य-अभ्यासकांचीही एक मोठी परंपरा आहे.

मराठीच्या सुदैवाने १९व्या शतकाच्या मध्यापासून नाट्यलेखनाला रंगभूमीची जोड असल्यामुळे दोन्हींची भरभराट झालेली दिसते. नाटक आणि रंगभूमी यांच्या बाबतीत पहिल्यापासून चिकित्सक अभ्यासक निर्माण झाल्यामुळे मराठीतील नाट्यसमीक्षाही विस्तृत प्रमाणात होत आली आहे. 'नावल व नाटके याजवर निबंध' या का. बा. मराठे यांच्या परखड टीकेपासून नाटक व रंगभूमीकडे जाणकारांनी लक्ष पुरविले आहे. राजकीय आणि सामाजिक क्षेत्रातल्या नेत्यांनीही रंगभूमीला आश्रय दिल्यामुळे तिला प्रतिष्ठाही प्राप्त झाली. अप्पाजी विष्णु कुलकर्णी, वसंत शां. देसाई, के. नारायण काळे, द. रा. गोमकाळे अशा अनेकांनी नाट्यसमीक्षा करताना रंगभूमी हे केंद्र मानले तर नाट्यलेखनाला केंद्रस्थानी ठेवून माधव मनोहर, रा. शं. वाळिंबे, मु. श्री. कानडे यांनी नाट्याची चर्चा केलेली दिसते. प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी मात्र नाटक आणि रंगभूमी या दोहोंमधील स्थित्यंतराकडे जागरूकपणे लक्ष पुरविलेले आढळते. प्रा. बनहट्टी व्यावसायिक रंगभूमीवर वावरलेले नाहीत. त्यांचा अनुभव हौशी स्तरावरचाच होता. १९३५ मध्ये नागपूरला 'अभिनव नाट्यमंदिर' ही सुशिक्षितांची संस्था स्थापन करून त्यांनी अनेक जुनी-नवी नाटके रंगभूमीवर आणली. 'नाट्यमन्वंतरा'मुळे त्या काळात मुंबई-पुण्यात नाट्यसृष्टीत स्थित्यंतर सुरू झाले होते. या वेळेपासून प्रा. बनहट्टी यांनी वीस एक वर्षे नाट्यसृष्टीच्या पुनरुज्जीवनाची आणि उत्कर्षाची चिंता वाहिली आणि त्यासाठी भरपूर कष्ट उपसले. त्यावेळी मराठी रंगभूमी जवळजवळ उद्ध्वस्त झाली होती. जुन्या नामांकित नाटक कंपन्या बंद पडल्या होत्या. समाजात चित्रपटांचे आकर्षण वाढले होते. रंगभूमीवरचे गाजलेले नट पोरके झाले होते; काही चित्रपटांकडे वळले होते. ही सर्व अवस्था निर्माण होण्याची कारणमीमांसा अनेकजण करीत होते. पण यातून उपाय सुचला तो प्रा. बनहट्टी यांना आणि अनेकांच्या सहकार्याने 'मराठी रंगभूमीचा शतसांवत्सरिक उत्सव' सांगली येथे १९४२ मध्ये घडवून आणला. १९३९ पासूनच त्यांनी या उत्सवाचा ध्यास घेतला होता. त्यासाठी त्यांनी महाराष्ट्रभर आणि बृहन्महाराष्ट्रातही प्रचारदौरे काढले. महोत्सवासाठी स्थापन झालेल्या समितीचे कार्याध्यक्षपद सांभाळले. १९४३ चा सांगलीचा शतसांवत्सरिक महोत्सव संस्मरणीय झाला आणि त्यापासून प्रेरणा घेऊन १९४४ पासून प्रतिवर्षी डॉ. अ. ना. भालेराव यांनी नाट्यमहोत्सव घडवून आणून मराठी रंगभूमीला नवचैतन्य दिले. डॉ. भालेराव यांचे कर्तृत्व मोठे आहेच; पण या महोत्सवाची मूळ कल्पना प्रा. बनहट्टी यांची आहे याचे मात्र आज फारसे कुणाला स्मरण नाही. उत्सवप्रिय लोकांनी जुन्या-नव्या नाटकांचा आस्वाद घेतला; पण त्यातून कायम टिकणारे भरीव काम उभे केले ते मात्र प्रा. बनहट्टी यांनी. या उत्सवाच्या आधीपासून 'मराठी रंगभूमीचा इतिहास' लिहिण्याचे मोठे काम त्यांनी अंगावर घेतले होते. बराच भाग लिहूनही झाला होता; पण प्रत्यक्षात ग्रंथरूपाने हा इतिहास प्रसिद्ध व्हायला १९५७ साल उजाडावे लागले. १८४३ ते १८७९ (विष्णुदास भावे कालखंड) एवढ्याच काळापुरता हा पहिला खंड आहे. पाचशे पृष्ठांच्या या विस्तृत इतिहासाची पुनर्मांडणी केली तर हा किर्लोस्करपूर्व काळाचा प्रमाणभूत असा 'नाट्यकोश' होऊ शकेल! या ग्रंथासाठी जी साधनसामुग्री प्रा. बनहट्टी यांनी मिळविली ती अक्षरश: अफाट आहे. या सर्वांतून अव्वल साधने कोणती, दुय्यम कोणती, मराठी रंगभूमीचा

प्रारंभ कुठे, कसा झाला, रंगभूमीच्या उगमाबाबत कोणते वाद आहेत, त्यांतून काय निष्पन्न होते, विष्णुदास भावे आणि त्यांच्या पाठोपाठ सुरू झालेल्या नाटक मंडळ्या, मराठी रंगभूमीची मुंबईच्या इंग्रजी वृत्तपत्रांनी केलेली तारीफ, तत्कालीन विदूषककेंद्रित नाटकांचे स्वरूप, इचलकरंजीचे दातारशास्त्री आणि त्यांनी पुराणांवरून रचलेली आख्याने, तत्कालीन नटवर्ग, त्याची गुणवत्ता आणि मर्यादा, तत्कालीन प्रेक्षकवर्ग आणि त्याची अभिरूची यांसारख्या शेकडो गोष्टींचा परामर्श अधिकारवाणीने, नि:पक्षपातीपणे आणि संयत पद्धतीने प्रा. बनहट्टी यांनी घेतला असल्यामुळे एखादा प्रमाणभूत इतिहास ग्रंथ कसा असावा याचा आदर्शच त्यांनी निर्माण केला आहे. हा इतिहास लिहिताना विश्वसनीय साधने मिळविण्यासाठी लेखकास वरीच धावपळ करावी लागली. 'बॉंबे टाइम्स' सारख्या इंग्रजी पत्रांचे अंक मिळू शकले. पण उपलब्ध मराठी पत्रांपैकी फारच थोड्यांनी तत्कालीन नाट्यसृष्टीस आपल्या पत्रात स्थान दिले आहे. कृ. आ. गुरुजी, आप्पाजी विष्णू कुलकर्णी आणि शंकरराव मुजुमदार अशा लेखकांनी नाटक व रंगभूमी याबद्दल थोडेफार लेखन केले त्याचा उपयोग प्रा. बनहट्टींना निश्चितच झाला. पण स्वत: सर्वत्र फिरून त्यांनी मिळतील ती कागदपत्रे जमविल्यामुळे या ग्रंथात ठिकठिकाणी नवी माहिती उजेडात आणण्याचे श्रेय लेखकाकडे जाते. असा हा जास्तीत जास्त परिपूर्ण रंगभूमीचा इतिहास लिहून अजोड असे कार्य प्रा. बनहट्टी यांनी केले आहे. यासाठी नाट्यप्रेमी मराठी जनतेने त्यांचे ऋणी असले पाहिजे.

किर्लोस्करपूर्व काळाचा परामर्श घेणारा ग्रंथ लिहिणाऱ्या प्रा. बनहट्टींना १८८० पासून नंतरच्या, तुलनेने आधुनिक काळाचा वेध घेणे सहज शक्य होते. पण हे काम पहिल्या खंडावरच थांबले. यानंतरचे इतिहासलेखन प्रा. बनहट्टींच्या तोडीचे अजून तरी कोणी केलेले नाही. तसे पाहिले तर गेल्या पन्नास-साठ वर्षांत नाटक आणि रंगभूमी यात रमलेले अनेक अभ्यासक झाले; आजही अनेक आहेत. पण १८८० पासूनचा म्हणजे आता शंभराहून अधिक वर्षांचा इतिहास समग्रपणे कोणी लिहिला नाही. ही गोष्टही प्रा. बनहट्टींचे असाधारणत्व दाखविणारी निश्चितच आहे.

प्रा. बनहट्टी यांनी वेळोवेळी जे स्फुट लेख लिहिले ते सहा संग्रहांमधून प्रकाशित झाले आहेत. त्यात युगप्रवर्तक नाटककार अण्णासाहेब किर्लोस्कर, खाडिलकरांची नाट्य क्षेत्रातील तपश्चर्या इ. लेख नव्या काळाचा वेध घेणारे आहेत. किर्लोस्करांच्या काळातील आनंद वामन बरवे यांच्यासारख्या अल्पलक्षित नाटककाराच्या कर्तृत्वाबद्दल त्यांनी तपशीलवार लिहिले आहे. 'नाट्य व रंगभूमी' या शीर्षकाच्या संग्रहात नाटक व रंगभूमी या विषयांशी संबंधितच सर्व लेख आहेत. त्यात काही चर्चात्मक लेख विशिष्ट प्रसंगी लिहिले गेले आहेत, काही भाषण लेख आहेत तर दोन लेख म्हणजे नवागतांच्या नाटकास लिहिलेल्या प्रस्तावना आहेत. एका भाषण लेखात त्यांनी 'नाटकाचे तंत्र' म्हणजे काय ते सांगितले आहे. या सगळ्याचा अर्थ एवढाच की, प्रा. बनहट्टी यांनी नाट्यविषयाकडे पाठ फिरवली नव्हती.

पुणे विद्यापीठाच्या न. चिं. केळकर व्याख्यान मालेत प्रा. बनहट्टी यांनी १९५७ मध्ये सहा व्याख्याने दिली. या व्याख्यानांचे 'मराठी नाट्यकला व नाट्यवाङ्मय' हे पुस्तक १९५९ मध्ये

प्रकाशित झाले. फार मोठ्या कालखंडाचा या सहा व्याख्यानांमधून लेखकाने परामर्श घेतला असल्याने त्याला धावता आढावा असे रूपे प्राप्त होणे स्वाभाविकच ठरते. त्यातही पहिल्या व्याख्यानात नाटक या वाङ्मयप्रकाराची वाङ्मयदृष्ट्या आणि नाट्यतंत्रदृष्ट्या चर्चा करून नंतर ते दुसऱ्या व्याख्यानापासून स्थित्यंतरांकडे वळले आहेत. पौराणिक ढोबळ नाटके, फार्स, इंग्रजीवरून अनुवादित नाटके, स्वतंत्र गद्य (किंवा बुकिश) नाटके यांचे विवेचन करून नंतर ते किर्लोस्करी परंपरेकडे वळाले आहेत. मराठी रंगभूमीचा भरभराटीचा काळ, विविध नाटककार आणि नाटक कंपन्या यांच्या श्रेयाची आणि अपश्रेयाची चर्चा करताना त्यांनी सर्वत्र कारणमीमांसाही केलेली दिसेल. कोल्हटकर-खाडिलकर यांच्या बाबतीतला 'कृत्रिमतेचे युग' हा त्यांचा अभिप्राय वेधक आहे. इब्सेनचे नाट्यतंत्र मराठीला कितपत मानवले, नाटक आणि संगीत, चित्रपटांचा नाट्यसृष्टीवर झालेला परिणाम, सुवर्णयुग कशामुळे संपले, हलाखीची मराठी रंगभूमी कुणामुळे तगून राहिली, शत सांवत्सरिक महोत्सवाचे फलित, सरकारी नाट्यस्पर्धा अशा शेकडो विषयांकडे प्रा. बनहट्टी यांनी लक्ष पुरविले आहे. अभ्यासातून आणि आजवरच्या अनुभवातून त्यांनी या क्षेत्रामधला अधिकार येथेही सिद्ध केला आहे. त्यांच्या हातून हा रंजक व परिणामक ग्रंथ सिद्ध झाला, यात शंका नाही. पण नाट्यसृष्टक्षच्या समग्र इतिहासाचे नंतरचे खंड त्यांच्या हातून होऊ शकले नाहीत, ही रुखरुख कायम राहते.

'नाट्याचार्य देवल' हा प्रा. बनहट्टी यांचा ग्रंथ १९६७ मध्ये प्रकाशित झाला. त्यांच्या नाट्यविषयक पुस्तकांपैकी प्रकाशनदृष्ट्या हे शेवटचे ठरते. पण हा ग्रंथ टप्प्याटप्प्याने निर्माण झाला आहे. अमळनेर येथील नाट्यक्षेत्रातले कार्यकर्ते प्रा. मो. द. ब्रह्मे यांच्या एका योजनेनुसार गाजलेल्या नाटककारांसंबंधी ग्रंथमालिका निर्माण व्हायची होती. या योजनेत प्रा. बनहट्टी यांनी देवलासंबंधीचा ग्रंथ लिहायचा असे ठरले होते. (प्रा. मो. द. ब्रह्मे हे नाटककारही होते. त्यांच्या 'आघात' या नाटकाला प्रा. बनहट्टी यांची आस्वादक प्रस्तावना लाभली आहे.) देवलांच्या सात नाट्यकृतीसंबंधी विस्तृत लेख लिहवून घेण्याचे काम म. सा. पत्रिकेचे तेव्हाचे संपादक के. नारायण काळे यांनी केले. देवलांच्या चरित्राची आणि इतर अनेक प्रकारच्या माहितीची जोड देऊन प्रा. बनहट्टी यांनी हे पुस्तक सिद्ध केले. 'नाट्याचार्य देवल' हा असा गुणसंपन्न समीक्षाग्रंथ आहे की त्याचे साहित्य जगताने उत्साहाने स्वागत केले. या ग्रंथाला साहित्य अकादमीचा १९६९ सालचा पुरस्कारही मिळाला. (त्या काळात एखाद्या नवख्या लेखकाच्या पहिल्यावहिल्या पुस्तकाला हा पुरस्कार दिला जात नसे; तर कोणत्याही लेखकाच्या समग्र साहित्यसेवेचा तो बहुमान असे.) १९३५ पासून मराठी नाट्यक्षेत्राशी आणि रंगभूमीच्या अभ्यासाशी प्रा. बनहट्टींचे जे नाव जोडले गेले होते त्याचेच हे फलित असे म्हटले पाहिजे. नाट्याचे आकर्षण आणि आकलन; आणि संशोधक समीक्षक म्हणून सिद्ध झालेले कर्तृत्व यांचा मिलाफ या ग्रंथात झाला आहे.

नाट्याचार्य देवल यांच्याबद्दल नाट्यरसिकांना नेहमीच कुतूहल वाटते. मराठी नाट्यसृष्टीचे ते एक प्रमुख शिल्पकार आहेत. अण्णासाहेब किर्लोस्करांचा शिष्य, हरिभाऊ आपट्यांचा मित्र, शंकरराव पाटकरांचा सहकारी, अभिनय कुशल नट, प्रतिभाशाली नाटककार, जाणता

नाट्यशिक्षक, व्यवहारदक्ष संस्थाचालक, भाऊराव कोल्हटकर, बालगंधर्व, गणपतराव बोडस अशा नटश्रेष्ठांचा नाट्यगुरू आणि स्वाभिमानी गृहस्थ अशी देवलांची अनेक पदरी प्रतिमा आहे. या सर्व अंगांचे संशोधकी वृत्तीने दर्शन घडविणे हे मोठे कठीण काम प्रा. बनहट्टींनी आत्मीयतेने पार पाडले आहे. एक शारदा नाटक सोडले तर देवलांची नाटके संस्कृत किंवा इंग्रजी नाट्यकृतींच्या आधाराने निर्माण झाली असल्यामुळे येथे संशोधनाला आणि तुलनात्मक चर्चेला भरपूर वाव होता. संस्कृत नाटकांवरून केलेल्या नाटकांची तुलना करणे तितकेसे कठीण नव्हते. बाणभट्टाच्या कादंबरीला 'शापसंभ्रम' नावाने नाट्यरूप देणे ही मात्र कसोटी पाहणारी बाब होती. मुळातील अनेक जन्मांच्या गुंतागुंतीच्या कथानकाला नेमके नाट्यरूप देण्यातले देवलांचे कौशल्य कसे जाणवते हे प्रा. बनहट्टी यांनी सप्रमाण दाखविले आहे. 'ऑथेल्लो' ला 'झुंजारराव' हे रूप देताना देवलांनी मराठेशाहीतील ऐतिहासिक वातावरण कसे सांभाळले आहे, त्यामुळे हे नाटक आपल्याच समाजाचे कसे वाटते हेही त्यांनी नमूद केले आहे. 'दुर्गा' हे देवलांचे पहिले नाटक. ते 'इझावेला' नावाच्या नाटकावरून रचलेले. मराठी नाटक आणि त्याचे मूळ इंग्रजी नाटक, (वस्तुत: गॅरिकने केलेली रंगावृत्ती) या सर्वच बाबतीत मराठी वाचक अनभिज्ञ असतो हे ओळखून या नाट्यरूपान्तराबद्दल लिहिले आहे. मोलिएरचे मूळ फ्रेंच 'गानारेल', त्याचे मर्फीने केलेले इंग्रजी रूपांतर 'ऑल इन द रॉंग' यावरून १८९३ मध्ये प्रथमत: देवलांनी लिहिलेला 'फाल्गुनराव' हा फार्स आणि १९१६ मध्ये त्याचे 'संशयकल्लोळ' नावाने केलेले संगीत नाटक या सर्व अवस्थांचे जे सम्यक दर्शन प्रा. बनहट्टी यांनी जे घडविले आहे त्यातून त्यांची संशोधकी वृत्ती आणि सर्वंकष नाट्यदृष्टी या दोहोंचा परिचय वाचकाला होतो. साधार लेखनाच्या बाण्यामुळे एखाद्या किरकोळ तपशिलाबाबतही ते कसे कसून प्रयत्न करीत हे या पुस्तकामुळे अभ्यासकास जाणवते. स्वतंत्र नाट्यकृती म्हणून गौरविले गेलेले शारदा नाटक, त्याला असलेला वास्तव घटनेचा आधार, 'शारदा'मधील व्यक्तिरेखन, तत्कालीन वातावरण, शारदामधील खटकणारे योगायोग आणि कृत्रिमपणे केलेला सुखान्त हे सर्व प्रा. बनहट्टी यांनी तपशीलवार सांगितले आहेच; पण याही नाटकाला मोलिएरच्या 'लाव्हार' नाटकाचा निदान काही बाबतीत आधार कसा आहे ही अगदी नवी माहिती त्यांनी उजेडात आणली आहे. ज्याचे श्रेय त्याला द्यायचे, केवळ रूढ समज जसेच्या तसे, स्वीकारायचे नाहीत ही प्रा. बनहट्टींची साक्षेपी वृत्ती अशा ठिकाणी ठसठशीतपण जाणवते. 'जीवनकार्य' या शीर्षकाचे या ग्रंथाचे प्रकरण लेखकाने केलेले देवलांच्या नाट्यविषयक समग्र कामगिरीचे यथायोग्य मूल्यमापन म्हणून लक्षात राहते. परिशिष्टे, टीपा, पूरक माहिती आणि मुख्य म्हणजे प्रत्येक पानावर दर पाच ओळींना दिलेले अंक यामुळे अभ्यासकांची जास्तीत जास्त योग्य कशी करता येते याचे हे पुस्तक एक उदाहरण ठरते. एकंदरीने 'नाट्याचार्य देवल' हा प्रा. बनहट्टींच्या लेखनकर्तृत्वाचा कलशाध्याय ठरतो.

'नाट्याचार्य देवल' हे पुस्तक परिपूर्ण असले तरी ते काही प्रा. बनहट्टी यांचे शेवटचे पुस्तक नव्हे. १९७४ मध्ये त्यांचे 'जोडयात्रा' हे पुस्तक प्रकाशित झाले. (त्याच वर्षी 'विष्णुपदी'चे तीन खंड त्यांनी प्रकाशित केले.) 'जोडयात्रा' हे शेवटचे पुस्तक असे फक्त

तांत्रिक अर्थानि म्हणायचे. वस्तुत: त्यांनी पत्नीसह प्रवासाला १९६२ मध्ये सुरुवात केली. नंतर वेळ होईल त्यानुसार ते असा प्रवास करत राहिले. टिपणे काढली अणि त्याआधारे छोटे मोठे लेख लिहिले. प्रा. बनहट्टी यांनी केवळ सहल म्हणून पर्यटन केले नाही. तीर्थयात्रा करणे, धार्मिक स्थळांचे दर्शन घेणे आणि त्या त्या ठिकाणी परंपरागत धर्मकृत्ये करणे हे त्यांचे उद्दिष्ट होते. हे उद्दिष्ट यथासांग पूर्ण झाले असे या पुस्तकावरून दिसते. श्रद्धाशील वृत्तीने हा प्रवास उभयतांनी केला असल्यामुळे आलेल्या अनुभवांमध्ये काही बाबतीत पुनरुक्ती झाल्याचे जाणवते. धार्मिकतेच्या अनुषंगाने जेवढे निसर्ग सौंदर्य पाहता येईल तेवढे पाहायचे आणि इतर प्रसिद्ध ठिकाणे जमल्यास पाहायची हा त्यांचा क्रम होता. (जबलपूर जवळील भेडाघाट आणि धुआँधार सारख्या स्थळाला भेट अशी निसर्गसौंदर्याची ठिकाणे तुलनेने या वर्णनात थोडी आहेत.)

आपले कुलदैवत म्हणजे गिरीचा बालाजी. तेथून सुरुवात करून क्रमश: तामिळनाडू, केरळ, कर्नाटक, पंढरपूर या क्रमाने त्यांनी दक्षिणेची यात्रा प्रथम केली. कालांतराने त्यांनी उत्तरेकडच्या सर्व तीर्थक्षेत्रांना भेटी दिल्या. मध्यप्रदेश, ओरिसा, उत्तरप्रदेश, बिहार, बंगाल असा भारताचा मोठा प्रदेश त्यांनी नजरेखाली घातला. धार्मिक दृष्टी प्रधान असल्यामुळे त्या त्या तीर्थक्षेत्रासंबंधीच्या आख्यायिका, चमत्कार कथा, परमेश्वरी कृपेच्या अतर्क्य घटना हे सर्व त्यांनी आवूर्जन सांगितले आहे. इतर अनेक लेखक प्रवासवर्णन करतात तेव्हा प्रवासात अनुभवलेल्या आणि लक्षात राहण्यासारख्या व्यक्तींचे, प्रसंगांचे आणि त्या त्या प्रदेशाचे वर्णन प्रामुख्याने करतात. प्रा. बनहट्टी यांनी अधूनमधून ते केले आहे. पण त्यावर त्यांचा भर नाही. आजवरच्या आयुष्यात पत्नीबरोबर कधी कुठला प्रवास केला नव्हता; आता निवृत्तीनंतर तिची धार्मिक इच्छा पूर्ण करण्यासाठी हा उद्योग लेखकाने केलेला दिसतो. ''पद्मावतीच्या आत्म्याला मोठा संतोष होत असे,'' यासारखी वाक्ये या प्रवासवर्णनात पुष्कळदा येतात. गृहस्थाश्रमी लेखकाचे दर्शन त्यातून घडते असे म्हणता येईल. प्रवासवर्णनाच्या निमित्ताने स्वत:बद्दल अगदी आवश्यक तेवढेच प्रा. बनहट्टी यांनी सांगितले आहे. सर्व ठिकाणचा प्रवास त्यांनी रेल्वेने केला.. अगदी क्वचित बसने. वर्तुळ प्रवास (राऊंड टूर) या योजनेनुसार ही यात्रा त्यांनी योजली. यात्रा कंपनीबरोबर ते गेले नसल्याने प्रवासातही निवांतपणाचा अनुभव त्यांना घेता आला. देवदर्शन, नद्यांचे स्नान आणि महापूजा, श्राद्धविधी इ. धार्मिक कृत्ये यांना या वर्णनात त्यामुळेच प्राधान्य आहे. अशा या प्रवासाला 'जोडयात्रा' असे त्यांनी म्हटले ते केवळ 'जोडीने' केलेल्या प्रवासामुळे. जोड हा उपसर्ग गौणत्व दर्शवितो. (उदा: जोडधंदा, जोडरस्ता इ.) जोड आणि यात्रा हा समासही विजोड आहे. तेव्हा जोड यात्रा म्हणण्याऐवजी 'सहप्रवास' हे शीर्षक योग्य ठरले असते. शब्दयोजनेबद्दल कटाक्ष असलेल्या लेखकाच्या हे कसे लक्षात आले नाही?

जन्मशताब्दीच्या निमित्ताने प्रा. श्री. ना. बनहट्टी यांच्या जीवनकार्याकडे पाहिल्यावर काही विशेष बाबी आज प्रकर्षाने जाणवतात. त्यांचे जीवन कधी हलाखीत गेले असे म्हणता येत नाही. त्यांच्या वाट्याला सुस्थिती आली पण त्यातून कधी सुखवस्तूपणा त्यांनी निर्माण होऊ दिला नाही. ज्ञानोपासनेचे त्यांना बाळकडूच मिळाले त्यामुळे आयुष्यभर त्यांनी ज्ञानसाधनाच












प्रामुख्याने केली. घडणीचे आयुष्य टिळक युगात आणि स्वतंत्र कर्तृत्वाच्या बहराच्या काळात ते गांधी युगात वावरले. देशभक्ती आणि ध्येयवाद हे त्यांचे जीवनसूत्र बनले. ज्ञानोपासना आणि समाजकार्य हीच त्यांची कर्तव्ये ठरली आणि या कर्तव्यांना ते जागले. ज्ञानेश्वर हे त्यांचे श्रद्धास्थान होते आणि चिपळूणकर, टिळक आणि आगरकर हे त्यांचे प्रेरणास्थळ होते. 'टिळक आणि आगरकर' हे त्यांचे प्रारंभीचे पुस्तक त्यांच्या अभ्यासूपणाचे, समतोल तरीही स्पष्ट अशा विवेचनाचे त्यांचे हे पुस्तक गाजले कारण टिळक आणि आगकर या परस्परविरोधी तरीही परस्पराश्रयी व्यक्तिमत्त्वांचे मर्म ते ओळखू शकले. चिपळूणकरांच्या जीवनकार्याने ते प्रभावित झाले, पण त्यांचे आंधळे भक्त बनले नाहीत. घाईगर्दीचे आणि अस्थिर जीवन त्यांच्या वाट्याला आले नाही; पण जे शांत स्थिर जीवन त्यांना जगता आले ते त्यांनी सत्कारणी लावले. त्यांचा मित्रपरिवार मोठा होता. त्यातले अनेकजण विरुद्ध टोकाची मते मांडणारे होते. पण विचाराच्या क्षेत्रातल्या या मतभेदांचे त्यांनी स्वागतच केले. (त्यामुळे अगदी विरुद्ध मताचे असलेल्या ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या सहकार्याने त्यांचे 'चिपळूणकर: द्विविध दर्शन' हे पुस्तक सिद्ध झाले. तेही अभ्यासकांना प्रिय झाले.) ज्याचे आपल्याला विशेष आकर्षण नाही त्या आधुनिक वाङ्मयाच्या वादविवादाच्या आखाड्यात ते कधी उतरले नाहीत. ज्ञानेश्वर, मोरोपंत, चिपळूणकर आणि मराठी नाट्यसृष्टी यातच ते रमले. या प्रत्येक बाबतीत त्यांनी कामांचे डोंगर उभे केले. शेवटी शांतपणे ते मृत्यूच्या अधीन झाले (२२ एप्रिल १९७५). एवढे बरे झाले की त्यानंतर दोन महिन्यांनी आलेली आणीबाणी या स्वातंत्र्यप्रेमी व्यक्तीला पाहावी लागली नाही!

■

डॉ. गं. ना. जोगळेकर, २२, मनीषा सोसायटी, पुणे ५२.

## स्वागत

- **उतावळा छे ! उतावळ्या :** वि. भा. पाटील, प्रतिभा प्रकाशन, नरेवाडी, पृष्ठे ३२.
- **गुंता :** मारुती यादव, अनुराधा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२८.
- **सेना म्हणे :** माधवराव सूर्यवंशी, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे, पृष्ठे १८२.
- **मामा क्षीरसागर जीवन यात्रा :** लीलावती भागवत, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे.
- **क्रांतिसिंह नाना पाटील :** बा. ग. पवार, मातृभूमी प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३२८.
- **हिरवा डोंगर :** दि. र. जायभाय, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे १२०.
- **विद्याधन :** शंकरानंद येडले, ज्ञानदीप प्रकाशन, लातूर, पृष्ठे ६४.
- **ऑपरेशन माथेरान :** म. वि. गोन्हे, गौरव प्रकाशन, कल्याण, पृष्ठे १५६.
- **हॅम्लेट :** अनुवाद : परशुराम देशपांडे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६४.
- **आधुनिक महाराष्ट्राचे राजकारण :** व. सं. सिरसीकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३९२.
- **जैव तंत्रज्ञान :** प्रमोद जोगळेकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७६.
- **रेडिओवरील भाषणे व श्रुतिका भाग १ :** पु. ल. देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २०६.
- **रेडिओवरील भाषणे व श्रुतिका भाग २ :** पु. ल. देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १९०.

# 'क्षितिजाकडची पुढची वाट' : अनिल

❖

संतोष शेणई

❖

अनिलांच्या कवितेला खास स्वत:चे असे स्थान मराठी काव्य क्षेत्रात लाभलेले आहे. ते सुमारे साठएक वर्षे काव्यलेखन करीत होते. फुलवात (१९३२), भग्नमूर्ती (१९४०), निर्वासित चिनी मुलास (१९४३), पेर्ते व्हा (१९४७), सांगाती (१९६१), दशपदी (१९७७) या संग्रहात त्यांची कविता समाविष्ट आहे. संख्येच्या दृष्टीने ही कविता फार नाही. 'प्रेम आणि जीवन', 'भग्नमूर्ती' व 'निर्वासित चिनी मुलास' ही दीर्घकाव्ये व दीडशेच्या आसपास स्फुट कविता त्यांनी रचल्या. कविता फार नव्हत्या, तरी या कवितेने 'क्षितिजाकडची पुढची पुढची' वाट शोधण्याचा प्रयत्न केला. या कवितेला 'वाट वळणाची' आवडत होती. ती वाट सरघसरणीची, पायफसणीची, वळणावरची अन् पानवसणीची आहे, याची जाणीव त्यांना होती. तरीही ती पुढे जात राहिली. त्यामुळे मराठी कविता समृद्ध करण्यात, तिचा प्रवाह आधुनिक करण्यात व अनेक दिशांनी मराठी कवितेला गतिमानता देण्यात अनिरुद्धांची कविता मोठा वाटा उचलते.

अनिलांच्या संवेदनशीलतेचे व त्यांच्या वाङ्मयनिर्मितीमागील जाणिवांचे स्वरूप निश्चित करण्यासाठी तत्कालीन परिस्थितीचा, घडलेल्या घटनांचा विचार करणे योग्य होईल. अनिलांच्या जाणिवांच्या संदर्भात नोंदवाव्यात अशा काही ठळक घटना अशा : १) विद्यार्थी दशेत लोकमान्य टिळकांच्या विचारांचा प्रभाव. पुढे सामाजिक सुधारणांबावत आगरकरांचे विचार महत्त्वाचे वाटले. विशेषत: बुद्धिप्रामाण्य व मनुष्यतेच्या ऐहिक सुखर्धनाची भूमिका त्यांना महत्त्वाची वाटली. २) भारतीय राजकारणात महात्मा गांधींच्या नेतृत्वाचा उदय झाला. ३) स्वातंत्र्य, समता, विश्वबंधुता या मूल्यांबद्दलची श्रद्धा व या मूल्यांपासून वंचित असलेल्या माणसांबद्दल बांधिलकी निर्माण झाली. ४) स्वातंत्र्य चळवळीतून तसेच डॉ. आंबेडकर व मार्क्सवाद्याच्या सामाजिक समतेसाठीच्या लढ्यांतून सर्वसामान्य माणसांच्या ठिकाणचे स्वत:भोवतीचे विरोधी वातावरण बदलून टाकण्याचे सामर्थ्य प्रत्ययास आले. ५) कुसुमावतींशी प्रेमविवाह झाला.

या साऱ्या गोष्टींचे संस्कार त्यांच्या संवेदनशीलतेवर उमटलेले दिसतात. ज्या सांस्कृतिक वातावरणात ते वाढले तेही ध्यानात घ्यायला हवे. इंग्रजी साहित्याच्या परिशीलनाने त्या पिढीला एक नवी जीवनदृष्टी लाभली, ती रोमँटिझिमची. रसिकतेच्या व सौंदर्याच्या गाढ संस्कारांतून एक वेगळीच सौंदर्यदृष्टी निर्माण होत होती. अनिलांनी हे संस्कार पचवले. मात्र त्यांच्या प्रेरणा अस्सल भारतीय राहिल्या. त्यांची स्वभाववृत्ती व काव्यदृष्टी यामुळे त्यांची कविता पृथगात्म राहिली. रविकिरण मंडळाचे कवी सुबोध घरगुती कवितांनी व्यासपीठ गाजवीत असतानाच, अनिलांची अत्यंत ऋजु, अंतर्मुख कविता पुढे आली.

*वेळ झाली भर माध्यान्ह*
*माथ्यावर तळपे ऊन*



अनुक्रमणिका

*नको जाऊ कोमेजून*
*माझ्या प्रीतिच्या फुला रे*

अशी संयमित, सुसंस्कृत कविता लिहून त्यांनी रविकिरण मंडळाविरुद्ध बंड केले. किंवहुना, रविकिरण मंडळाने काव्यक्षेत्रात केलेली कोंडी फोडून, मराठी कवितेला व्यापक जीवनविश्वास सामोरे जाण्याचे बळ दिले. मराठी कवितेची केशवसुतांशी तुटलेली नाळ अनिलांनी पुन्हा जोडली. रविकिरण मंडळाच्या काळात अंतर्मुखतेला काहीशी पारखी झालेली कविता पुन्हा अंतर्मुखतेकडे वळवली.

**'लावियेली फुलवात'**

अनिलांची ओळख मानवतावादी कवी, प्रयोगशील कवी, 'मुक्त छंद' व 'दशपदी' या पदबंधाचे प्रवर्तक अशीही करून देता येत असली, तरी ते मुळात संपन्न भावकवी आहेत. 'फुलवात' या पहिल्याच संग्रहाने त्यांच्या कवितेचा अस्सलपणा व पृथगात्मता ठसवली. गोविंदाग्रज, भा. रा. तांबे, माधव जूलियन यांच्या प्रेमकवितेच्या बहराचा तो काळ होता. या कवितेचे मोठ्या प्रमाणात अनुकरण केले जात होते. या काळात अनिल सौम्य, शीतल स्वतंत्र कविता रचत होते.

*लागे डोळ्यासी न डोळा*
*सारी रात्र कशी साहू?*
*घोर अंधारात देवा*
*तुझे रूप कसे पाहू?*

अशी अंतमुर्ख व सौम्य प्रतीतिधर्मी कविता ते आत्मविश्वासाने लिहिले झाले.

कुसुमावती - अनिल यांचा प्रेमविवाह ही या काळात घडलेली एक महत्त्वाची घटना. म्हटले तर तिचे स्वरूप खासगी व वाङ्मयबाह्य होते. पण एका अर्थी आधुनिक जीवनदृष्टीचा तो एक भाग होता. 'आधुनिक काव्यातील प्रेम ही एक हृदयाची तळमळ आहे, मनोमन जाणीव आहे, हृदयावरचा चिरकाल टिकणारा संस्कार आहे. ते प्रेमाचे वर्तन अंतर्मुख दृष्टीचे, अंत:करणाच्या उडालेल्या खळबळीचेच असते' ('फुलवात', प्रस्तावना, पृष्ठ १३-१४), या शब्दांत अनिलांनी ही आधुनिक जीवनदृष्टी सांगण्याचा प्रयत्न केला आहे. या प्रेमकवितेत वैयक्तिक जिव्हाळा, हळुवारपणा व मानसिकतेवर भर आहे. त्याचबरोबर त्यातील उत्कटता संयमाने खुलते. संतकाव्यातील शब्दकळेच्या संगतीने आर्तता, गूढता, प्रतिकात्मकता या भावकवितेतून समोर येतात. त्यांच्या प्रेमविवाहाच्या व प्रेमाला घर मिळवून देण्याच्या अपेक्षेतून ही कविता आकाराला येते. 'तुझा फुलमाळी झाल्यापासूनच मला गावंसं वाटायला लागलं आहे' ('प्रतिभा', वर्ष १, अंक २३, नोव्हेंबर १९३३, पृष्ठ ६१) अशी कबुली ते देतात, तेव्हा त्यात कुसुमावतीबाईंविषयीचा प्रेमभाव व्यक्त होतोच; पण त्यात एका कवीहृदयातील स्पंदनांचा, स्फूर्तिचाही भाग आहे; हे लक्षात येते.

'फुलवाती'तील अनिलांचे भावविश्व समृद्ध होत गेलेले दिसते. त्यांच्या ठायीची सौंदर्यवृत्ती 'पेर्ते व्हा', 'सांगाती', 'दशपदी' या संग्रहातून अंतर्गत एकरूपतेने विकसित होत होती.

अनुभव व कलात्मकता या दोन्ही दृष्टीने अनिलांच्या भावविश्वासाचा विकास पाहण्याजोगा आहे. त्यांचे प्रीतीजीवन समृद्ध आहे. या प्रीतिजीवनात रसिकता जोपासली आहे. त्यामुळे अनिलांच्या कवितेत प्रेमाला 'घरा'चे आकर्षण सतत आहे. मात्र

*एखादी कविता*
*साधे गोड गीत*
*म्हणू सुस्वरात*
*अंधार पडता*
*घरात रंगता — ज-ग-वि-स-र-ता!*

अशा मंद फिक्या रंगात हे आकर्षण व्यक्त होते. सौंदर्यवृत्तीच्या सौम्य रंगातील आविष्कार हे त्यांच्या कवितेचे वैशिष्ट्य आहे. यामुळे त्यांच्या कवितेचे सौंदर्य कौटुंबिक काव्यापेक्षा वेगळेपणाने नजरेला येते.

अनिलांच्या भावविश्वात निसर्गालाही महत्त्वाचे स्थान आहे. सौंदर्याची सूक्ष्म जाण असल्याने निसर्गातील स्निग्ध ओलावा ते टिपतात. त्यांच्या भावात्मक संवेदना निसर्गप्रतिमांद्वारे व्यक्त होताना प्रतिमाचित्रे निर्माण होतात.

*बाई या पावसानं*
*लावियेली झीम झीम*

अशी संथ झिमझिमणारी कविता कधी समोर येते. तर कधी 'श्रावण झड बाहेरी मी अंतरि भिजलेला, पंखी खुपसून चोच एक पक्षी निजलेला' अशी निसर्गचित्र व भव्यस्थिती एकत्रित प्रकटलेली सापडते. त्यांच्या प्रेमविषयक व निसर्गाबद्दलच्या कविता आशय-अभिव्यक्तीच्या दृष्टीने अंतर्गत एकरूपतेने विकसित झालेल्या आढळतात, असा प्रा. रमेश तेंडुलकर यांनी अभिप्राय नोंदवला आहे. ('मराठी रोमँटिक काव्य प्रतिभा', पृष्ठ १३३).

**'आधिचा प्रसाद'**

अनिलांनी पूर्वसूरींच्या काव्याचे, संस्कृत साहित्याचे, संतकाव्याचे संस्कार डोळसपणे करून घेतले होते. त्यामुळे त्यांच्या कवितेत श्रुत योजना आढळते. केवळ काव्यात्म क्लृप्ती म्हणून ही श्रृत योजना होत नाही, तर त्यामुळे अनेकविध भावसौंदर्याच्या समृद्धीचे सौंदर्य अनिलांच्या कवितेला प्राप्त होते. कवी जयदेवांच्या रचनेचा प्रभाव अनिलांवर होता. जयदेवांच्या 'अष्टपदी'तून अनिलांची 'दशपदी' आकाराला आली. जयदेवांच्या 'गीत गोविंदा'तील 'अद्भुत वामन' हा विस्मयजनक शब्द 'भग्नमूर्ती'त आला. अनिलांनी योजलेली 'चुंबनदानी' ही अर्थप्रतिमा म्हणजे बालकवींच्या काव्यातील 'चुंबनदान' या शब्दाचे श्रुत योजन आहे. 'अजविलापा'तील 'पल्वल' हा शब्द अनिलांच्या कवितेत 'उथळ उथळ पल्वलात संगळून जळ बसते' असा येतो. 'मेघदूता'तील 'वल्मीकाग्रात प्रभवति धनुः खण्डमाखण्डलस्य' या ओळीतील कल्पना —

*इंद्रधनुष्याची कमान जेथून निघता दिसली वासलातून*
*तेथपर्यंत तू दिलीस साथ सात रंगाच्या वर्तुळातून*

अशी व्यक्त झाल्याची कबुली अनिलांनीच 'दशपदी'च्या प्रास्तविकात दिली आहे. 'सौंदर्य केवळ गात्रांची चारूता नाही तर जननांतरीचे नाते आहे' हा स्वानुभव सांगतानाही तेथे कालिदासाचे 'रम्याणि वीक्ष्य...' हे श्रुतयोजन येते.

बहादुरशहा जाफरचा प्रसिद्ध शेर —

*उम्रे दराज खुदासे माँगकर लाये थे चार दिन*
*दो आरजू में गये दो इन्तजार में*

हा अनिलांच्या अनुभूतीशी नाते सांगताना

*वाटते आयुष्य अवघे चार दिवसांचेच झाले*
*कसे गेले कळले नाही. हाती फार थोडे आले*
*दोन दिवस आराधनेत दोन प्रतिक्षेत गेले*
*अर्धे जीवन प्रयत्नात अर्धे विवंचनेत गेले*

असा समोर येतो. हेच श्रुतयोजन पुढे नारायण सुर्वे यांच्या कवितेत आढळते, ते असे —

*दोन दिवस वाट पाहण्यात गेले; दोन दुःखात गेले*
*हिशोब करतो आहे किती राहिलेत डोईवर उन्हाळे*
*शेकडोवेळा चंद्र आला, तारे फुलले, रात्र धुंद झाली,*
*भाकरीचा चंद्र शोधण्यातच जिंदगी बरबाद झाली*

रविंद्रनाथ टागोरांच्या 'जगतेरआनंद जग्ने आमार निमंत्रण' चा सादध्वनी अनिलांच्या कवितेत 'जगतातच जीवन आहे, जीवनातच आहे आनंद, येथे जगातच जीवनानंद' असा ऐकू येतो.

**'अंधाराचे सरी'**

अनिलांच्या कवितेत श्रुतयोजन जसे भावसंदर्भाच्या समृद्धीचे सौंदर्य देते, तसे त्यांच्या कवितेत प्रेमभावनेला गूढात्मकतेने वेगळे परिमाण लाभते. त्यांच्या प्रेमकवितेत भावनिक अंग महत्त्वाचे असतेच; पण प्रेयसीच्या व्यावहारिक प्रेमाला परमेश्वरी पावित्र्याची झळाळी प्राप्त होते. 'फुलवात', 'मंदिर', 'मूर्ती' यांसारखी प्रतिके ते वापरतात तेव्हा दोन प्रेमी व्यक्तींचा लौकिक पातळीवरचा मनोमिलनाचा व्यवहार जिवाशिवाच्या मिलनाचा सोहळा वाटू लागतो.

*हृदय जिथे ठेविले*
*तिथेच शिर ठेवितो*
*असो शरीरही तिथे*
*जिथे आत्मा खेळतो*

या प्रकारे लौकिक-अलौकिक यांच्या सीमारेषा एकमेकात मिसळतात. ''प्रेमिकांनी आपला आविष्कार सरळपणे करण्याची जी प्रथा केशवसुत संप्रदायात रूढ होती, तीऐवजी रूपकाच्या भाषेने, पण अत्यंत उत्कटपणे प्रेमप्रीतीचे वर्णन अनिल यांनी केले. त्यांची प्रेमप्रतीती खरी असल्याने, त्यात जिव्हाळा चांगला उतरला आहे. थोडेसे गूढतेचे आवरणही त्याच्या सौंदर्यात भर पाडण्यास उपयुक्त झाले. या गूढगुंजनाचा संबंध तत्त्वज्ञान किंवा जिवाशिवाचा संबंध नव्हता. गोविंदाग्रजांनी तत्त्वज्ञानावर अधिष्ठित अशा बुद्धिगम्य, गूढगुंजनाचा जो खेळ केला,

त्यापासून वेगळे असे हे गूढगुंजन आहे,'' असे या गूढगुंजनाचे नेमके स्वरूप रा. श्री. जोग यांनी सांगितले आहे ('साहित्य विवेचन', पृष्ठ २५०).

अनिल हे श्रद्धाळू अंत:करणाचे होते. त्यामुळे कवितांतून अज्ञेयाचा वेध ते घेत असल्याचे आढळतेच. या प्रवासात ईश्वराकडे पाहण्याच्या त्यांच्या दृष्टीतही फरक होत गेलेला आहे.

*शक्तीने ज्या ग्रहगोल नभपसारा*
*फिरे रात्रंदिन विश्वव्याप सारा*
*तीच शक्तीही नाव चालविते,*
*तिला संकेतस्थळी पोचविते*

अशी सर्वश्रेष्ठ परमेश्वर सर्वत्र भरून उरला असल्याची त्यांची श्रद्धा सुरुवातीच्या काळात दिसते. पण पुढच्या काळात 'जेथे जातो तेथे, तू माझा सांगाती' असे ते म्हणत नाहीत. माणसाच्या कर्तृत्वाला, व्यक्तित्वाला महत्त्व देणारा कवी त्या परमेश्वराला युगसापेक्ष असा प्रश्न विचारतो —

*हाती हात धरून माझा*
*चालवणारा कोण तू?*
*जेथे जातो तेथे माझा*
*काय म्हणून सांगाती?*

अनिल आस्तिक जरूर होते, पण ईश्वराची आंधळी भक्ती त्यांना अमान्य होती. त्याचबरोबर भीमराव कुलकर्णी म्हणतात त्याप्रमाणे येथे ''आपल्या संस्कृतीत मुरलेल्या कर्मविपाकांच्या, दैवाधीनतेच्या अगतिकतेच्या कल्पनेचा मनाला होणारा काच व्यक्त झाला आहे.'' ('चिरयौवन', प्रस्तावना, पृ. १८). त्यातूनच अनिल ईश्वराला बजावतात —

*खांद्यावर हात माझ्या सदोदित असा ठेवू नको ना*
*अशानेच माझी वाढ खुंटत जाते*
*खूपखूप माझी उंची एकाकीच माझी मला वाढवू दे*
*तुझ्याहून नसली तरी तुझ्यासमान होऊ दे.*

**'नव बीजे पेरा'**

अनिलांच्या काव्यातील गूढगुंजनाला व अज्ञेयाच्या शोधाला त्यांची रसिक सौंदर्यवादी वृत्ती पोषक ठरली. त्यांच्या या कवितांमधून आंतरिक आत्मनिष्ठा व भावगर्भता अनुभवायला मिळते. त्यांच्यातील संपन्न भावकवी जेव्हा व्यक्तिजीवनाकडून समाजजीवनाकडे पाहू लागला, तेव्हा कविमन अंतर्मुखतेकडून बहिर्मुखतेकडे झुकताना दिसते. मूळच्या आत्मलक्षी असलेल्या कवीला परिस्थितीने आवाहन केले आणि 'अवघ्या अभाग्यांचे अश्रू उभे आमच्या डोळ्यांत' अशी व्यापकता त्याच्या ठायी आली. हा कवी जीवनाभिमुख, आशावादी व चिंतनशील प्रवृत्तीचा आहे. दोन्ही महायुद्धांनी जगात केलेला विध्वंस, समाजजीवनातील उलथापालथी, यांत्रिक संस्कृती यांनी कवीला व्यथित केले. कवी एकीकडे साम्राज्यवादी पिपासा, भांडवलशाहीचे शोषक रूप पाहत होता, तर दुसरीकडे मार्क्सवाद व मानवतावाद कवीला

गरजेचा वाटू लागला होता. त्यातूनच ते वैचारिकदृष्ट्या आगरकरांच्या व काव्यदृष्ट्या केशवसुतांच्या जवळ गेले. त्यामुळे त्या दोघांच्याही सुधारणावादाचे रूप अनिलांच्या कवितेत आढळते. आगरकरांचा सुधारणावाद हा सुखवादाच्या व बुद्धिवादी तत्त्वज्ञानाच्या प्रभावांतून निर्माण झाला होता. तर चराचरात ईश्वर पाहणाऱ्या सर्वेश्वरवादातून केशवसुत समतेकडे व बंधुतेकडे पाहतात. अनिल हे दोन्ही संस्कार स्वत:त मुरवतात.

*मोडून क्षुल्लक, कृत्रिम भर*
*विस्तारावे लागे जीवनक्षेत्र*
*सर्व देशाचे संवेदनामय*
*बनवावे लागे एक शरीर*
*एक हृदय*

आणि

*आणि अशा ह्या निसर्गातच*
*जगणे आहे मानवप्राण्या*
*निसर्गानेच परिवेष्टित*
*जीवन त्याचे*
*जीवनविकास त्यातच त्याचा*
*निसर्गातल्या सर्व शक्तींचा*
*पाहिजे त्याने विचार केला*
*कारण मानवी जीवन आहे*
*निसर्गाचाच एक घटक*
*... विचारी अंश*

या 'भग्नमूर्ती' या एकाच दीर्घकाव्यातील दोन तुकड्यात हे दोन्ही संस्कार दिसतात. अनिलांचा सामाजिक काव्यात्मपिंड आगरकर व केशवसुतप्रणित चिंतनावर पोसला. अंतर्मुखता, चिंतनशीलता हा त्यांचा स्वभाव. त्यामुळे त्यांच्या सामाजिक कवितेचा चिंतनशीलता हा स्थायीभाव बनला. त्यांच्या कवितेतील वैचारिक भूमिका नेहमीच तेजस्वी व ध्येयशील राहिली. तरीही त्यांचा सामाजिकता हा काव्यपिंड नव्हता. त्यांचे सामाजिक विचार आदर्श असले, तरी कवितेसाठी आवश्यक अशी आत्मनिष्ठा सामाजिक कवितांबाबत दुबळी होती. त्यामुळे 'अन्याय घडो कोठेही चिडून उठू आम्ही' ही तिची घोषणा बनली, तरीही समाजाकरिता 'नेता' होण्याची ताकद या कवितेत आली नाही. ती क्षमता केशवसुतांच्या कवितेत आहे. केशवसुत कवीच्या रूपात एक निर्माता पाहतात; तसे अनिल करीत नाहीत. अशा विविध कारणामुंळे त्यांची सामाजिक कविता म्हणून गौण स्थानी राहते. तरीही ही कविता मराठी काव्येतिहासात महत्त्वाची ठरते, याचे कारण काय? 'प्रेम आणि जीवन', 'भग्नमूर्ती', 'निर्वासित चिनी मुलास' या कवितांमुळे मराठी कवितेने निरनिराळ्या वातावरणीय विषयांना स्पर्श केला, हे दुर्लक्षिता येत नाही.

अनिलांच्या सामाजिक कवितेमुळे मराठी कवितेचे केशवसुतांच्या कवितेशी पुन्हा नाते

जोडले गेले. पण दि. के. वेडेकर म्हणतात त्याप्रमाणे — ''केशवसुतांच्या काळातील जुन्या आशयाचा व आवेशाचा हा नुसता पडसाद नाही, तर जुन्या प्रेरणेला आत्मसात करणाऱ्या एका नवकवीची नव्या जगाला ही 'साद' होती ('साहित्य, निर्मिती व समीक्षा' : पृष्ठ ८४).'' अनिलांची ही साद पुढच्या पिढीतल्या विंदा करंदीकर, शरच्चंद्र मुक्तिबोध, नारायण सुर्वे यांनी ऐकलेली दिसते. 'सारेच दीप कसे मंदावले आता' या अनिलांच्या कवितेतील सामाजिक वैफल्य करंदीकरांच्या 'जडाच्या जांभया'तून विदारक स्वरूपात प्रकटतांना दिसते.

*संस्कृतीला साज नाही*
*मानवाला माज नाही*
*आज कोणा, आज कोणा,*
*जीवनाची खाज नाही*

आणि,

*जीवनाला वाव नाही*
*तारुण्याची चमक नाही, धमक नाही*
*साहित्यात चैतन्य नाही*
*संगीतात इंगित नाही आणि कलेमध्ये उकल नाही*

या अनुक्रमे करंदीकर व अनिल यांच्या काव्यपंक्तीत आशयाचे साम्यच दिसते. विंदांच्या कवितेत जसा एक सूर मर्ढेकरांचा आहे, तसा दुसरा सूर अनिलांचा आहे. तर अनिलांची सामाजिक पुनर्रचनेची भूमिका व प्रक्षोभरस यांनी मुक्तिवोधांसाठी 'मळवाट' तयार केली होती.

**'कल्लोळांचा मेळ'**

अनिल केवळ 'फुलवाती'च्या यशावर समाधानी राहिले नाहीत. कोणत्याही भावकवीला भावनांच्या कल्लोळांचा मेळ घालण्यासाठी नवी वाट शोधावी लागते. आशयाच्या अंतर्गत मागणीतून ही वाट पुढे येणे गरजेचे असते. मुक्तछंद, दशपदी, खंडकाव्य हे प्रयोग काव्यनिर्मितीच्या चिकित्सेतून झाले. या प्रयोगांचे यशापयश प्रत्येकजण वेगवेगळे मोजेल, पण त्यांची मूळ काव्यवृत्ती या प्रयोगांमुळे निकोप, मोकळी, निर्लेप व गतिमान राहिली हे नाकारता येणार नाही. अनिलांची कविता परंपरेशी नाते सांगणारी असली, तरी ती कोणत्याही संप्रदायात अडकली आहे. त्यांनी मुक्तछंदाचा आग्रह नंतरच्या काळात धरला. पण 'फुलवात'मधील महत्त्वाच्या जातिरचना काव्याशयाला मुक्ततेकडे नेणाऱ्या आहेत. म्हणजे त्यांच्या मुक्तरचनेचा, प्रेमविषयक स्वच्छंद जाणिवेचा आविष्कार 'फुलवात' पासूनच दृष्टीस पडतो. तर 'पेर्ते व्हा' मधील भावकवितांना सलग असा आकृतिबंध असतो. उदाहरणार्थ, 'उद्या' ही कविता.

*उद्या ! उद्या तुझ्यामध्येच*
*फाकणार ना उषा ?*

अशी सुरवात झालेल्या त्या कवितेत पुढेही प्रत्येक चरणाची सुरवात 'उद्या' या शब्दानेच होते. 'उद्या, तुझी धरून कास', 'उद्या, तुझ्यासाठीच आज', 'उद्या तुझ्यामध्ये निवान्त' या प्रत्येक चरणाच्या पहिल्या ओळीनी आंतरिक संबंध जुळतोच, पण अर्थपूर्ण आकृतिबंध समोर येण्याच्या

दृष्टीने भावतरंगही निर्माण होतात.

'पहाट' या कवितेत प्रत्येक कडव्याच्या अखेरीस 'सारे काही', 'मागे राही, 'उजाडले', 'मागतात' या सारख्या निरर्थक शब्दांच्या द्विरुक्तीची काव्यात्म क्लृप्ती ते योजतात व त्यातून भाववृत्ती फुलवतात. 'पेर्ते व्हा' सारख्या कवितेत अंतर्गत लयीनुसार भावसौंदर्याने, नादसौंदर्याने व विचारसौंदर्याने एका सजीव आकृतीबंधाची कल्पना देणारे भावचित्र समोर येते.

'फुलवात' मधील स्निग्ध प्रेमभावना व्यक्त करणारे अनिल 'पेर्ते व्हा' मध्ये वैचारिक भाष्यप्रधानतेकडे वळू लागलेले दिसतात. 'भग्नमूर्ती', 'प्रेम आणि जीवन', 'निर्वासित चिनी मुलास' या खंडकाव्यामध्ये वैचारिक बोधपरताच अधिक दृष्टीस पडते. याच टप्प्यावर, भावकवितेसाठी गीतमयता व चिंतनशील वैचारिक कवितेसाठी मुक्तछंद अशी रचनादृष्ट्या वेगळीक त्यांना जाणवली. अर्थात, अनिलांची कविता ही प्रतिक्रियात्मक नाही; ती 'क्षितिजाकडची पुढची पुढची' वाट शोधणारी आहे. 'फुलवात' मधील भावकवी पुन्हा 'दशपदी' मध्ये भेटतो. पण आता तो आशय-अभिव्यक्तीच्या दृष्टीने पक्व झाला आहे. अस्सल सौंदर्यानुभवाचा प्रत्यय देणारी व कवीच्या अंतर्मनाचा तळ शोधणारी अशी ही कविता आहे. त्यांची खंडकाव्ये किंवा दीर्घकाव्ये भावकवितेसारखी परिणामकारक ठरत नाहीत. त्यात काव्यात्मकता फारच कमी आहे. त्या चिंतनिका ठराव्यात. भावकाव्याची प्रकृती सांभाळून त्याचा चिंतनगर्भ विचार करण्याचा प्रयत्न येथे अयशस्वी होतो. "अनिल ज्या साकल्याची काव्यात्म अपेक्षा करतात ते साकल्य त्यांच्या कवितेत उतरत नाही. काव्यात्मकतेची आभा इतर सर्व घटकांवर पडण्याऐवजी काव्येतर घटकच कवितेवर कुरघोडी करताना दिसतात" ('खंडनमंडन', पृष्ठे १४८), असे याचे उत्तर गो. म. कुलकर्णी शोधतात.

अनिलांनी मुक्तछंदाचे समर्थन करताना 'आपल्या साधेपणामुळे नवकाव्याचे वाहन होण्यास मुक्तछंदच योग्य आहे' (भग्नमूर्ती, दुसरी आवृत्ती, पृष्ठ १६) असे सांगून ठेवले आहे. हे आता पटतेही. पण मुक्तछंदामुळे कविता रुक्ष बनू पाहण्याचा आक्षेप त्यांच्यापासूनच केला जात आहे. त्यांच्या कवितेतील रुक्षता छंदोबद्धतेमुळे झाकली जात होती, ती मुक्त छंदामुळे उघडी पडली, असे मत डॉ. अक्षयकुमार काळे यांनी (अर्वाचीन मराठी काव्यदर्शन, पृष्ठ २८६) नोंदवले आहे.

अनिलांनी नवयुगाचे प्रतिपादन केले. ते प्रयोगशील राहिले, तरी ते नवकाव्याला आकार देऊ शकले नाहीत, याचे मुख्य कारण त्यांचे आशावादी, सौंदर्यवादी व पारंपारिक मन. अनिल व मर्ढेकर दोघेही तुकारामाला पार्श्वभूमीवर ठेवून 'मी' व्यक्त करीत असले, तरी त्या काळातील जीवनसंघर्षाचे, उद्‌ध्वस्ततेचे चित्रण अनिल काव्यात्मकतेच्या पातळीवर करण्यात कमी पडतात. त्यांची अशी कविता ही वैचारिक निबंधासारखी होते. अर्थात त्यांनी नवकाव्य रचले नसले, तरी मराठी कवितेला नवा सौंदर्याकार देत नवकाव्याला सन्मुख काव्यात मोठा वाटा उचलला हे निःसंशय.

*(आत्माराम रावजी देशपांडे ऊर्फ कवी अनिल : जन्म-११ सप्टेंबर १९०१; निधन - ८ मे १९८२)*

■

संतोष शेणई
बी-२, शांतीदीप, सर्व्हे १८/३/१०, विठ्ठलनगर, पुणे ४११०५१.

# डॉ. नांदापूरकरांचे पुण्यस्मरण

❖

डॉ. द. दि. पुंडे

❖

**डॉ.** ना. गो. नांदापूरकर हे मराठवाड्यातील एक तळमळीचे अभ्यासक म्हणून सर्वदूर परिचित आहेत. मराठी भाषा व वाङ्मय यांचा त्यांनी एकलव्य-निष्ठेने अभ्यास केला. २००१-०२ हे वर्ष डॉ. नांदापूरकरांच्या जन्मशताब्दीचे वर्ष आहे. त्यांच्या मराठीविषयक कार्याचे संस्मरण करून केवळ मराठवाड्यातीलच नव्हे तर समग्र महाराष्ट्रातल्या आणि वृहन्महाराष्ट्रातल्या मराठीप्रेमी मंडळींनी मराठी भाषा व वाङ्मयविषयक काही उपक्रम करून डॉ. ना. गो. नांदापूरकर जन्मशताब्दी वर्ष साजरे करायला हवे.

डॉ. नांदापूरकरांचा जन्म १४ सप्टेंबर १९०१ या दिवशी झाला आणि ९ जून १९५९ या दिवशी त्यांचे निधन झाले. मात्र वयाची साठीही न ओलांडू शकलेल्या या व्यक्तीने स्वकर्तृत्वाने मराठी साहित्य जगतावर काही एक ठसा उमटविलेला आहे. डॉ. नांदापूरकर म्हणताच आपल्या मनात सर्वप्रथम त्यांच्या 'मुक्तमयुरांची भारते'' या आगळ्यावेगळ्या ग्रंथाची आठवण जागी होते. पण या ग्रंथाव्यतिरिक्तही नांदापूरकरांचे कर्तृत्व आवर्जून लक्षात घ्यावे असे आहे. त्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या एकूणच वाङ्मयीन कर्तृत्वाचे येथे अवलोकन करावेसे वाटते.

'मुक्तमयुरांची भारते' हा १९५६ साली प्रसिद्ध झालेला ग्रंथ वास्तविक नांदापूरकरांची पीएच्.डी. (मराठी) पदवीसाठी केलेल्या संशोधनाचे फलित आहे. मुद्दाम लक्षात घ्यायची गोष्ट म्हणजे नांदापूरकर हे संस्कृत विषय घेऊन एम्.ए. झालेले होते. एम्.ए. (संस्कृत) ही पदवी त्यांनी अलीगड युनिव्हर्सिटीतून प्राप्त केलेली होती. संस्कृतच्या या मूलभूत अभ्यासाचा फायदा त्यांना पीएच्.डी. करताना झालेला असणार हे स्पष्टच आहे. मुक्तेश्वर आणि मोरोपंत या दोघांच्याही मराठीतील महाभारत रचना त्यांनी मूळ संस्कृतमधील महाभारताशी शब्दश: तोलूनमापून पाहिलेल्या आहेत. नांदापूरकरांच्या मनात मराठीचा इतका अभिमान दाटून होता की आपल्या शोधनिष्कर्षात त्यांनी मुक्तेश्वर व मोरोपंत या दोघांचीही व्यासांच्या तोडीचे 'महाकवी' म्हणून गणना केलेली आहे. हा अतिशयोक्ती अलंकार सोडून दिला तरी डॉ. नांदापूरकरांच्या गंभीर अभ्यासाचे मोल उरतेच. ज्या काळी 'तौलनिक साहित्याभ्यास' या संकल्पनेची गंधवार्ताही मराठीच्या अभ्यासक्षेत्रात नव्हती, त्या काळात नांदापूरकरांनी एक तौलनिक साहित्याभ्यास केला होता, हे एक ऐतिहासिक सत्य आहे. मराठी महाभारतकार हे स्वतंत्र प्रज्ञेचे कवी होते, हे नांदापूरकरांना जणू अधोरेखित करून सांगायचे होते. म्हणूनच 'मुक्तमयुरांची भारते' या ग्रंथासोबत १९५६ सालीच त्यांनी 'मराठी महाभारताचे स्वातंत्र्य' नावाचे एक पुस्तक प्रसिद्ध केलेले आहे. ह्या छोट्या पुस्तकाचे प्रकाशन 'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया'सारख्या मान्यवर संस्थेने केलेले आहे, ही गोष्टदेखील आवर्जून ध्यानात

घेण्यासारखी आहे. मराठवाड्यात उमललेल्या डॉ. नांदापूरकरांच्या प्रज्ञाप्रतिभेस पश्चिम महाराष्ट्रात यथायोग्य मानसन्मान मिळालेला होता, याचीच ही गोष्ट निदर्शक म्हणावयाची. आपला हा अभ्यास डॉ. नांदापूरकरांनी पीएच्.डी. पदवीच्या बासनात गुंडाळून ठेवला नाही. उलट ते या आपल्या अभ्यासाला पुनःपुन्हा उजाळा देताना दिसतात. 'महाभारतातील देव'', 'धर्मराजः महात्मा की मुत्सद्दी', इत्यादी त्यांचे सुटे लेख या दृष्टीने मुद्दाम पाहण्यासारखे आहेत. 'महाभारतातील लोक' या विषयावर तर त्यांनी 'प्रतिष्ठान'मध्ये एक-दोन नव्हे तर चांगले नऊ लेख लिहिले होते.

'लोक', 'लोकसमूह', (ते ग्रंथरूपाने प्रसिद्ध व्हायला हवेत.) 'लोकविज्ञान' या नवसंकल्पनेचा अभ्यास अलीकडे अलीकडे सुरू झालेला आहे. परंतु याही बावतीत डॉ. नांदापूरकरांनी अगोदरच ओनामा करून ठेवलेला दिसतो. डॉ. नांदापूरकर यांनी लोकसाहित्याचा — विशेषतः स्त्रीगीतांचा जो अभ्यास करून ठेवलेला आहे, तो दुर्लक्षिण्यासारखा नाही. 'माहेरचं मराठी' (१९५३), 'मराठीचा मोहोर' (१९५६) आणि 'मराठीची माया' (१९५८) यांसारखे त्यांनी संपादित केलेले स्त्री-गीतांचे संग्रह किंवा 'लोकगीतातून आढळणारी धर्मनिरपेक्षता' ('प्रतिष्ठान', जुलै १९५४), 'गंगाखेडची गीतगंगा आणि मराठमोळ्यांचे सामाजिक जीवन' (मराठवाडा, दिवाळी १९५१) आणि 'मराठी स्त्रीगीता'तील 'उगवले नारायण'' ('सन्मति', डिसेंबर १९५३ व 'अमृत', फेब्रुवारी १९५४) यांसारखे त्यांनी लिहिलेले स्फुट लेख लोकसाहित्याच्या त्यांच्या अभ्यासाची विस्तारलेली क्षितिजे दाखवितात. ओवी हा लोकसाहित्याच्या आविष्कारासाठीच अवतरलेला छंद होय. साहजिकच त्याचा सखोल अभ्यास करण्याची ऊर्मी नांदापूरकरांच्या मनात दाटून येणारच. या एकट्या 'मराठी ओवी'वर नांदापूरकरांनी १९५३ ते १९५६ या काळात पाच लेख लिहिलेले आढळतात. अशा रीतीने नांदापूरकरांनी मराठी लोकसाहित्याच्या अभ्यासाचे दालन अनेक अंगांनी समृद्ध केलेले होते.

साधारणतः १९६० पूर्वीचे मराठीचे अभ्यासक — विशेषतः मध्ययुगीन मराठी साहित्याचे बहुसंख्य अभ्यासक हे संहिता संशोधन-संपादनावरच संतुष्ट राहिलेले दिसतात; वाङ्मयाचा सामाजिक अभ्यास करण्याची कल्पनाही त्यांच्या मनाला शिवलेले दिसत नाही. वाङ्मयाद्वारे मध्ययुगातील माणूस, त्याचे मन व जीवन जाणून घेण्याचा फारसा प्रयत्न झालेला दिसत नाही. एकूण मध्ययुगीन वाङ्मयाच्या अभ्यासाची एक पठडीच या काळात तयार झाली होती. पण डॉ. नांदापूरकर या पठडीतून मुक्त झालेले जिज्ञासू अभ्यासक होते. 'नांदापूरकरांनी ...नवीन दृष्टीचा स्वीकार केला तो रचनाकर्त्याची भूमिका व सामाजिक दृष्टी या संदर्भात' असे हैद्राबादच्या डॉ. उषा जोशी यांनी 'मुक्तमयुरांची भारते' या ग्रंथासंदर्भात म्हटलेले आहे. नांदापूरकरांची साहित्याच्या सामाजिक अभ्यासाची ही दृष्टी त्यांच्या इतरही अभ्यासात दिसते. ते 'गंगाखेडची गीतगंगा' नुसती तपासत नाहीत, तर तिच्याद्वारे दिसणारे 'मराठमोळ्यांचे सामाजिक जीवन' देखील चितारतात. मध्ययुगीत वाङ्मयाच्या आधारेच ते 'आमच्या मध्यकालीन शिक्षण पद्धती' (प्रतिभा, ऑगस्ट १९४९) जाणून घेतात. संत तुकारामांकडे ते जे वळतात, ते त्याचे सामाजिक

कार्य जाणून घेण्यासाठीच. ('संतशिरोमणी तुकाराम आणि त्यांचे सामाजिक कार्य', मराठवाडा, ९ मार्च १९५०).

वाङ्मयाच्या आधारे समाजस्थितीचे कोणतेही अंग जाणून घेता येते, हे नांदापूरकरांना चांगलेच ठाऊक होते. याचा पुरावा म्हणून 'यादवकालीन वेषभूषा' (प्रतिष्ठान, मार्च १९५५) या त्यांच्या लेखाकडे अंगुलिनिर्देश करता येईल. वाङ्मय हे समाजातून निर्माण होते आणि समाजच व्यक्तीस वाङ्मयनिर्मितीच्या प्रेरणा पुरवीत असतो हे साहित्याच्या सामाजिक अभ्यासातील विचारसूत्र डॉ. नांदापूरकर मनी बाळगून होते असे वाटते. कारण त्यांनी मुळी 'मराठी वाङ्मयाची सामाजिक प्रेरणा' (ज्योति, १९५३-५४) या नावाचाच एक लेख लिहिलेला आहे. सांगण्याचे तात्पर्य हेच की वाङ्मयाचा समाजशास्त्रीय अभ्यास या अलीकडे विकसित झालेल्या अभ्यासपद्धतीची तोंडओळख का होईना, पण डॉ. नांदापूरकरांना होती.

डॉ. नांदापूरकर यांचे स्मरण आणखी एका महत्त्वाच्या कारणाकरिता केले पाहिजे. ते कारण म्हणजे 'मायबोलीची कहाणी' या नावाने त्यांनी 'मराठी भाषा आणि साहित्याचा कहाणीच्या माध्यमातून कथन केलेला रसपूर्ण इतिहास.' ही 'मायबोलीची कहाणी' पुस्तकरूपाने येण्याअगोदर डॉ. नांदापूरकर यांनी हैदराबाद येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'निजाम-विजय' नावाच्या वृत्तपत्रातून लेख-मालिका रूपात प्रसिद्ध केली होती. त्याच वेळी त्या लेख-मालिकेने दत्तो वामन पोतदारांसारख्या चिकित्सक विद्वानाचे स्वत:कडे लक्ष वेधून घेतले होते. द. रा. कानेगावकर यांनी 'मराठीचिये नगरी' (भाग १ ला) या नावाने लिहिलेल्या गोष्टीरूप मराठी वाङ्मयेतिहासास पोतदारांनी 'नगरप्रदेश' या नावाने प्रस्तावना लिहिली आहे. त्या प्रस्तावनेत "हैदराबादच्या 'निजामविजया'त एक 'मराठीची कहाणी' अलीकडे प्रसिद्ध होत असते, ती खुसखुशीत आहे" असे प्रशस्तिपत्रच डॉ. नांदापूरकरांना दिलेले आहे. नांदापूरकरांनी हा इतिहास गोष्टीरूप तर लिहिलाच पण तो तसा लिहितानाच गोष्टीचा खास देशी बाण म्हणजे 'कहाणी' हा प्रकार स्वीकारला.

वाङ्मयेतिहास लेखनासाठी डॉ. नांदापूरकरांनी स्वीकारलेली ही कहाणी-कथनशैली इतकी अभिनव होती की ती पाहून डॉ. शं. दा. पेंडसे यांच्यासारखे विद्वान अभ्यासकही केवळ चकित होऊन गेले. आपल्या 'पुरस्कारा'त पेंडसे लिहितात, "हे पुस्तक गद्यात लिहिले असले तरी वस्तुत: ते गद्यकाव्यच झाले आहे. ...मोत्यासारख्या शब्दांनी आणि छोट्या-छोट्या वाक्यांनी... भाषाप्रभूंच्या वाङ्मयाचे वैभव प्रा. नांदापूरकरांनी रमणीय रीतीने दाखविले आहे व ते दाखविताना स्वत:चे भाषावैभवही प्रकट केले आहे." डॉ. नांदापूरकरांच्या या कहाणीशैलीने दत्तो वामन पोतदार तर इतके प्रभावित झालेले दिसतात की आपले 'कहाणीची कहाणी' हे मनोगतच त्यांनी नांदापूरकरांचे अनुकरण करीत कहाणीच्याच बाझात प्रकट केले आहे. ("मायबोलीची कहाणी, नवलाईची बोलणी, करावी कोणी, मोगलाईतल्या नांदापूरकरांनी. भले भले नांदापूरकर, तुम्ही कलमबहाद्दर, सांगितली कहाणी मनोहर..." इत्यादी) खंत इतकीच आहे की नांदापूरकरांनी सांगितलेली ही मायबोलीची कहाणी 'सुफळ' झालेली असली तरी 'संपूर्ण' झालेली नाही. मुकुंदराजांपाशी सुरू झालेला तिचा ओघ तुकारामापाशीच थबकला आहे. रामदास व नंतरचे कवी, बखरकार नि शाहीर यांच्या कहाण्या

सांगायचे नांदापूरकरांकडून राहून गेले.

डॉ. नांदापूरकर हे प्राधान्येकरून मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या चर्चाचिकित्सेत रमलेले व्यक्तिमत्त्व होते, हे खरे आहे. परंतु त्यांना आधुनिक वाङ्मयाचे वावडे होते असे नव्हे. 'मराठवाड्यातील अर्वाचीन मराठी वाङ्मय' किंवा 'आधुनिक मराठी वाङ्मय प्रगतिपथावर आहे काय?' यांसारखे लेख त्यांनी लिहिलेले आहेत. इतकेच नव्हे तर नवकाव्य ताजेतवाने असण्याच्या काळात म्हणजे १९५० सालीच त्यांनी 'स्वातंत्र्य व नवकाव्य' असाही एक लेख लिहिल्याचे आढळते. नांदापूरकरांची प्रज्ञा अशी आधुनिकाशीही जवळीक साधणारी असल्यामुळेच रवींद्रनाथ टागोरांच्या काव्याचा अनुवाद ते करू शकले. त्यांच्या निधनानंतर १९६० साली टागोरांच्या 'गार्डनर'चा त्यांनी केलेला 'फुलारी' हा अनुवाद प्रकाशित झालेला आहे. 'गार्डनर'साठी त्यांची योजिलेल्या 'फुलारी' या प्रतिशब्दावरून त्यांच्या अनुवादप्रतिभेची कल्पना यावी. जिब्रानच्या 'टीअर्स अँड लॉफ्टर्स'चा अनुवाद त्यांनी 'हसू आणि आसू' या नावाने केलेला होता. तोही त्यांच्या निधनानंतरच १९६५ त प्रसिद्ध झालेला आहे. डॉ. नांदापूरकर यांनी ह्या काव्यांचे अनुवाद केले, याचे कारण ते स्वत: एक भावनाशील कवी होते. 'वाग्विलास' व 'माझी मराठी' हे त्यांचे काव्यसंग्रह प्रकाशित झालेले आहेत. त्यांच्या कवितेबाबत डॉ. उषा जोशी म्हणतात, 'नांदापूरकरांनी व्यक्तिगत आयुष्यात खूप सोसले, खूप गिळले. ...त्यांचे भावजीवन त्यांच्या कवितेत भळभळा प्रगट झालेले आहे... मन कुठे तरी हलके व्हायलाच हवे होते. कवितेने त्यांना ही साथ दिली. ती होती म्हणून नांदापूरकर अखेरपर्यंत कार्यरत होते.'' त्यांची कविता हा त्यांचा विसावा किंवा विरंगुळाच होती. अशी कविता अर्थातच अपरिहार्यपणे व्यक्तिगतच राहते.

डॉ. नांदापूरकर हे एक कुटुंबवत्सल गृहस्थ होते, देशस्थी खाक्याचे यजमान होते, रसाळ व्यक्तिमत्त्व धारण केलेले प्रांजळ शिक्षक होते. (ते कै. प्रा. नरहर कुरुंदकरांचे मामा होते. कुरुंदकरांचे शिक्षण काही काळ त्यांच्याच तालमीत झाले होते.) एम्. ए. झाल्यावरोबर त्यांनी मराठीच्या अध्यापनाचे कार्य सुरू केले. काही काळ त्यांनी हायस्कूलांत शिक्षकी केली. १९३८ त ते 'ज्युनियर लेक्चरर' झाले. १९५२ ते १९५६ या काळात ते उस्मानिया विद्यापीठाचे प्रोफेसर व मराठी विभागप्रमुख होते. या काळात त्यांनी चिं. नी. जोशी यांनी घालून दिलेली अभ्यासपरंपरा पुरेपूर सांभाळली होती. त्यांनी गरजेनुसार मराठी साहित्याविषयी हिंदी व इंग्रजीतूनदेखील लेख लिहिले होते ही गोष्ट जाता जाता पण मुद्दाम अधोरेखित करून सांगायला हवी.

अशा व्रतस्थ अभ्यासकाला त्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने अंत:करणपूर्वक अभिवादन व श्रद्धांजली.

*(कृतज्ञता : हा लेख तयार करताना उस्मानिया विद्यापीठ, मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिका, अंक १७, १९९९ मधील डॉ. उषा जोशी यांनी डॉ. ना. गो. नांदापूरकरांवर लिहिलेल्या लेखाचा आधार घेतलेला आहे.)*

■

डॉ. द. दि. पुंडे
४/९ अर्चनानगर, गणेशनगरजवळ, पुणे ४११०३८.

# 'कलेचे कातडे' या कादंबरीमागची निर्मितिप्रक्रिया

❖

आनंद यादव

❖

मराठी साहित्यातील कलावादाच्या काळाचा आणि त्या काळातील कलावादी साहित्यिकांचा अभ्यास करताना प्रथम माझ्या मनाशी काही वैचारिक निष्कर्ष जमा झाले होते. अनेक कलावादी साहित्यिकांच्या वाङ्मयक्षेत्रातील वर्तनातून त्यांच्या अनेक वृत्तिप्रवृत्ती निदर्शनास आल्या होत्या. त्यांच्या एरवीच्या व्यावहारिक जीवनातील वृत्तिप्रवृत्तीही लक्षात आल्या होत्या.

या वृत्तिप्रवृत्तींचा एकत्रित विचार करताना माझ्यातील साहित्यिकाला असे वाटू लागले की यावर एखादी कादंबरी लिहिता येण्यासारखी आहे. त्यांतील निवडक आणि महत्त्वाच्या वृत्तिप्रवृत्तींना सामावून घेणारा नायक आपणास कादंबरीसाठी कल्पिता येईल. तसेच नायकाशी संबंधित इतर पात्रांनाही उर्वरित वृत्तिप्रवृत्तींतून साकार करता येईल.

याचा निर्णय मनाशी झाला आणि मी उद्योगाला लागलो. हळूहळू नायक, नायिका, इतर पात्रे, सुट्या घटना, सुटेसुटे प्रसंग, स्थल, काल मनात भिरभिरू लागले. मुक्तपणे त्यांच्यावर चिंतन सुरू झाले. एक सर्वसाधारण ढाचा मनासमोर उभा राहिला.

असा धूसर, संदिग्ध ढाचा मनासमोर दिसू लागला की मी तो जसा जमेल तसा भराभर लिहून काढतो. एखादा पुतळा तयार करण्यापूर्वी शिल्पकार जसा स्वत:च्या डोळ्यांसमोर असावा म्हणून शाडूचा चिखल थापून एक स्थूलाकार प्रत्यक्षात साकार करतो आणि त्याच्याच आधाराने त्यात मनातील पुतळ्याचे बारकावे प्रत्यक्षात आणू लागतो, तशी ही कादंबरीचीही माझी प्रक्रिया असते. तशाच स्वरूपाचे माझे पहिले लेखन स्थूल असते. कादंबरीचे पहिले लेखन करण्यासाठी ते मार्गदर्शक ठरते. त्या लेखनाला कादंबरीचा ढाचा म्हणता येईल.

मी तयार केलेल्या या ढाच्यात केवळ मलाच समजणारी वाक्ये, शब्द, माझ्या व इतरांच्या जीवनातील घटना किंवा वाचलेल्या विविध पुस्तकांतील व्यक्ती, त्यांचे संदर्भ, त्यांचे वर्तन हीही अतिसंक्षिप्त रूपात लिहून ठेवलेली असतात. हे सर्व संदर्भ खाजगी, केवळ माझ्या स्मरणासाठी असतात. 'कलेचे कातडे' या विशिष्ट कादंबरीसाठी मला ते विशेष प्रमाणात करावे लागले.

विशेष प्रमाणात करावे लागले, याचे कारण असे की ह्या कादंबरीतील सर्व पात्रे, प्रसंग, घटना, कथानक इत्यादी काल्पनिक आहेत. ही पात्रे, प्रसंग इत्यादी नेमके कशावरून सुचले याची नोंद असली की ती वाचताच सगळे काही मनासमोर उभे राहते. कादंबरीची संपूर्ण मांडणीच केवळ कल्पनाजन्य असल्यामुळे मधे काही कारणाने लेखनात खंड पडला तर हे सर्व लक्षातही राहणार नाही, म्हणून मी हे नोंदवजा लेखन करून ठेवले.

आतापर्यंतच्या माझ्या बहुतेक कादंबऱ्यांच्या बाबतीत असा प्रसंग उद्‌भवला नव्हता. कारण त्यांचं स्फुरण प्रामुख्यानं माझ्याच आयुष्यातील किंवा मी पाहिलेल्या घटना, प्रसंग,

व्यक्ती, हकिकती यांच्या ठोस आधारेच झालेले होते. पूर्वीच्या या कादंबरीतील घटना, प्रसंग, पात्रे व त्यांच्या जीवनरेखा स्थूलमानाने माझ्या जीवनातील किंवा प्रत्यक्ष मी जवळून पाहिलेल्या व्यक्तींच्या जीवनातीलच होती. त्यामुळं स्मरणात ठेवण्याची वेगळी धडपड मला करावी लागली नव्हती.

— पण 'कलेचे कातडे' या कादंबरीच्या बाबतीत मात्र ते करावे लागले. सारांश पूर्वीच्या कादंबऱ्यामध्ये घटना, प्रसंग, पात्रे, कथानक इत्यादी आधीच स्थूलपणे सिद्ध असे. त्या सर्वांच्या आधारे कादंबरी लेखनाचा विचार करताना माझ्या मनात त्या विशिष्ट कादंबरीचा आशय तयार होई. मग त्या आशयाच्या आधारे मी कोणत्या विशिष्ट घटना, प्रसंग घ्यायचे, कोणते वगळायचे, हे निश्चित करत असे. तसेच प्रत्यक्षातील व्यक्तींना कादंबरीत पात्रे म्हणून घेताना त्यांचे कोणते विशिष्ट स्वभावविशेष घ्यायचे व कोणते अनावश्यक म्हणून वगळायचे, हेही निश्चित करत असे. त्यामुळे त्या कादंबरीच्या विशिष्ट विषयाला आणि आशयाला कलात्मक न्याय देऊन, अपेक्षित परिणाम साधता येत असे.

पण 'कलेचे कातडे'मध्ये अगोदर आशय आणि त्या अनुषंगाने विषय, घटना, प्रसंग, पात्रे, कथानक मला कल्पनेने निर्माण करावे लागले. म्हणजे ही निर्मितीप्रक्रिया माझ्या आजवरच्या कादंबऱ्यांचा प्रक्रियेच्या नेमकी उलटी होती.

मला ही प्रक्रिया पूर्वपरिचित नव्हती. त्यामुळे मी मनाशी प्रथम निर्णय घेतला की, आपण ही प्रक्रिया स्वीकारायची आणि कादंबरी लिहायचीच.

या संकल्पित कादंबरीचे आणखी एक वैशिष्ट्य माझ्या लक्षात आले. ते असे की, ही कादंबरी नायकप्रधान असणार आहे; घटनाप्रधान किंवा कथानकप्रधान असणार नाही. त्यामुळे नायक-व्यक्तीच्या वैशिष्ट्यपूर्ण स्वभावानुसार तिच्या जीवनांत घटना, प्रसंग घडताना दाखविणे अपरिहार्य आहे किंवा असेही म्हणता येईल की नायक व्यक्तीच्या स्वभावातील विशिष्ट पैलूंमुळेच तिचे जीवन घडते आहे, त्या पैलूंमुळेच त्या व्यक्तीची नियती घडते आहे, ती व्यक्ती आपल्या विशिष्ट स्वभावामुळे एका विशिष्ट स्वरूपाच्या, अपरिहार्यपणे होणाऱ्या जीवनाच्या शेवटाकडे खेचली जात आहे, हे आपण विसरता कामा नये.

आणखीही काही गोष्टी माझ्या लक्षात आल्या— 'कलेचे कातडे' चा नायक शहरवासी, वयाने प्रौढ आणि मध्यमवर्गीय स्तरातील दाखविण्याची आवश्यकता आहे. कारण प्रस्तुत कादंबरीत मला मराठी साहित्यातील कलावादाच्या प्रभावाचा काळ दाखविणे अभिप्रेत होते. महाराष्ट्रीय समाजात साहित्यातील कलावादाचा प्रभाव हा प्रामुख्याने पुणे, बडोदा, ठाणे, मुंबई, औरंगाबाद, नागपूर या शहरांच्या जीवनातील तत्कालीन साहित्यिकांवर विशेष होता. त्याचे प्रमुख केंद्र पुणे-मुंबई व तेथील उच्चभ्रू साहित्यविश्व हेच होते. म्हणून कादंबरीत येणाऱ्या घटना, पात्रे, परिसर तेथीलच घेणे आवश्यक होते.

मराठी साहित्यात कलावादाचा काळ १९४५ ते १९७० पर्यंतचा मानला जातो. या काळात मराठीमध्ये कलावादी साहित्यिक आपली साहित्यनिर्मिती करत होते.

सामान्यपणे कोणताही साहित्यिक लेखनाचा प्रारंभ आपल्या पंधरा सोळाव्या वर्षी करत



अनुक्रमणिका

असतो. त्याचे साहित्य वयाच्या पंचविशीच्या आसपास प्रसिद्ध होऊ लागते. कारण तोपर्यंत त्याला साहित्यनिर्मितीच्या मंत्र-तंत्राची, लेखन गांभीर्याची, मन:पूर्वकतेची जाणीव झालेली असते — आता १९४५ च्या आसपास एखाद्या कलावादी साहित्यिकाचे साहित्य प्रसिद्ध होण्यास प्रारंभ झाला असेल तर त्या साहित्यिकाचे त्यावेळचे वय पंचविशीच्या आसपासचे धरले तर त्याचा जन्म १९२५ च्या आसपासचा निघतो.

म्हणून प्रस्तुत नायकप्रधान कादंबरीतील नायकाचा जन्म १९२५ च्या आसपासचा आहे, असं गृहीत धरून, नायकाच्या 'एकूण आयुष्याची' म्हणजे साधारणपणे नायकाच्या वयाच्या अंदाजे सत्तरीपर्यंतची मांडणी करण्याने निश्चित केले.

वस्तुस्थिती अशी असल्याने 'कलेचे कातडे' या कादंबरीत साधारणपणे १९२५-३० ते १९९०-९५ चा काळ कल्पिलेला आहे. कादंबरीत मला नायकाच्या समग्र साहित्यातील जीवनाचा धांडोळा घेणे अभिप्रेत होते. प्रस्तुतच्या संबंध काळाचा त्याच्यावर पडलेला प्रभाव, ऐन पंचविशीत त्याचे शहरात येऊन स्थिर होणे, त्याने स्वीकारलेली शहरी जीवनशैली, या शैलीचा त्याच्या पुढच्या संबंध जीवनावर झालेला परिणाम, तसेच त्याने साहित्याविषयींची स्वीकारलेली कलावादी भूमिका आणि तिचाही त्याच्या पुढील जीवनावर झालेला परिणाम, हे सर्व दाखविणे मला अभिप्रेत होते. अर्थातच समग्र जीवनाचा आवाका अभिप्रेत असल्यानेच नायक निदान वयाच्या सत्तरीच्या आसपास झालेला असणे आवश्यक होते. हा काळ मी फक्त माझ्या मनाशीच योजला होता. इसवी सनाच्या रूपात कादंबरीत त्याचा उल्लेख करण्याची मला गरज वाटत नव्हती. केवळ कथानकाची मांडणी करताना सामाजिक संदर्भ अचूकपणे यावेत, त्यांचा विपर्यास होऊ नये; म्हणून मी हा काळ मनाशी योजला होता.

प्रत्यक्षात कादंबरीगत जो काळ घेतलेला आहे तो नायकाच्या जीवनातील शेवटच्या आठ-दहा वर्षांचाच आहे. कारण ही काही नायकाची चरित्रात्मक कादंबरी नाही. कलात्मक दृष्ट्या नायकाच्या जीवनातील अथपासून इतिपर्यंतच्या सर्व घटना दाखविणे मला आवश्यक वाटत नव्हते. फक्त कलावादी व्यक्तिमत्त्वाच्या एका जीवनाची अखेर परिणती काय होते, एवढेच मला दाखवायचे होते. म्हणून नायकाच्या जीवनातील शेवटची आठ-दहा वर्षे दाखवून त्या अंतर्गत त्याचे कादंबरी-विषयाला आवश्यक तेवढेच जीवन मी प्रस्तुत कादंबरीत घेतले. नायकाच्या भूतकाळातील आवश्यक तेवढ्या घटना वा अन्य संदर्भही मी आवश्यक तेथे कलात्मकतेने निर्दिष्ट करत जायचे योजले होते.

कादंबरीतील नायकाचे व्यक्तिमत्त्व तत्कालीन सामाजिक वास्तवाशी सुसंगत असावे, म्हणून मी थोडा तत्कालीन मराठी समाजाचा आवश्यक तेवढा समाजशास्त्रीय आणि सामाजिक मानसशास्त्रीय अभ्यासही केला. विशेषत: पुणे-मुंबईतील कलावादी साहित्यिकांचे व्यक्तिमत्त्व समाजशास्त्रीय दृष्ट्या समजून घेणे, हा त्याचा हेतू होता.

देशाच्या स्वातंत्र्यपूर्व काळात मध्यमवर्गीय, पांढरपेशा, शहरवासी, बुद्धिजीवी वर्गच मराठी साहित्याचा निर्माता होता. या काळात मराठी साहित्याला शहरातील ब्राह्मणी वर्गाच्या मर्यादा पडल्या होत्या. हा वर्ग मूलत: बुद्धिजीवी होता. शिक्षक, कारकून, सुपरिंटेंडंट, अधिकारी

किंवा तत्सम लिखापढीच्या नोकऱ्या करणारा होता. जीवनातील प्रत्यक्ष शरीरश्रमाचे उद्योग तो करत नव्हता. तो ज्या ग्रामीण समाजातून शहरात येत होता त्या ग्रामीण समाजातही तो शारीरिक श्रमाची शेती प्रत्यक्ष कसणारा किंवा विणकर, सुतार, लोहार इत्यादी स्वरूपाची कामेही स्वत: करणाऱ्यांपैकी नव्हता. शहरातही त्याने ड्रायव्हर, क्लीनर, हमाल, कारखान्यातील कामगार, गोदी कामगार यासारखी कामे करणे स्वीकारले नाही. मूलत: बुद्धिजीवी, मध्यमवर्गीय, पांढरपेशी कामे त्याने स्वीकारली. त्यामुळे शहरात त्याच्या अनुभवविश्वावर मध्यमवर्गीय मर्यादा पडल्या होत्या. परिणामी समग्र मराठी जीवन त्याच्या साहित्यात येत नव्हते. तो स्व-वर्गीय आणि वर्णीय व्यवस्थेच्या कक्षेतीलच अनुभव मांडत होता.

त्या काळात मध्यमवर्गीय पांढरपेशा नोकऱ्यांतही बेताचा पगार असे. तो कुटुंब चालवण्यापुरताच मिळत असे. त्यामुळे प्रवास वगैरे करून, किंवा पूर्ण वेळ निर्मिती करणारा साहित्यिक होऊनही तो अनुभव गोळा करू शकत नव्हता. किंवा स्वत:च्या जीवनकक्षेच्या बाहेर जाऊन खेड्यापाड्यातील मराठी समाजात शिरून प्रत्यक्ष अनुभव घेण्याचीही त्याची आर्थिक आणि मानसिक कुवत नव्हती. परंपरेनेही या वर्गावर जातीय आणि वर्णीय बंधने पडली होती. सामान्यपणे साहित्य निर्मिती ही त्याची फावल्या वेळातील निर्मिती होती. त्याच्या साहित्यात तो आपले अनुभव मनोरंजक आणि चटकदार पद्धतीने मांडत असे.

अशा मांडणीला कलावादी भूमिका ही प्राथमिक स्वरूपात फार जवळची वाटत होती. पाश्चात्त्य संस्कृतीचा प्रभाव शंभर - सव्वाशे वर्षे या पांढरपेशा शहरी समाजावर होता. ऑफिसमध्ये साहेबासारखे दिसण्यात, त्याच्यासारखे इंग्रजी बोलण्यात, तसाच पोशाख करण्यात, त्याला धन्यता वाटत होती. त्या संस्कृतीचे यथाशक्य अनुकरण करण्यात त्याला भूषण वाटत होते. त्यातूनच आपणही आधुनिक झाल्याचा आनंद तो मिळवत होता. पूर्वपरंपरेने जखडलेल्या त्याच्या हिंदू मानसिकतेला पाश्चात्यांच्या भौतिकवादी जीवनातील नैतिक आणि लैंगिक ढिलेपणा आकृष्ट करत होता. व्यक्तिकेंद्रित भोगवादी वृत्ती तो आत्मसात करू पाहत होता. — त्यासाठी या वर्गाला पाश्चात्यांचे विविध क्षेत्रांतील तत्त्वज्ञानही आकृष्ट करत होते. त्यामुळे त्याच्या या मानसिकतेला तात्त्विक बैठकही लाभणार होती. परिणामी त्याने पाश्चात्यांचे कलावादाचे तत्त्वज्ञान स्वीकारले आणि त्याच्या मर्यादांचा, दोषांचा, संभाव्य परिमाणांचा विचार न करता तो कलावादी वृत्तीने साहित्यनिर्मिती करू लागला. त्याच्या या मनोवृत्तीचे परिणाम १९४५ नंतरच्या त्या मध्यमवर्गीय जीवनावर, साहित्यावर आणि समाजावरही झाले. — अशा परिस्थितीत घडलेला नायक मला अभिप्रेत होता. त्या अनुषंगाने त्याचे व्यक्तिमत्त्व घडविण्याचा निर्णय मी घेतला होता.

पण प्रत्यक्ष पहिले लेखन करताना एक वेगळीच समस्या उद्‌भवली. तिचे स्वरूप काहीसे वैयक्तिक होते. — आजपर्यंत मी ग्रामीण जीवनाशी संबंधितच कादंबऱ्या लिहिल्या होत्या. ग्रामीण जीवनावरील लेखन करण्याचा मला सराव झाला होता. माझ्या परीने मी ते जीवन समजून घेतले होते. खरे तर शहरातील मध्यमवर्गीय, पांढरपेशा, बुद्धिजीवी वर्गाचाही गेली चाळीस वर्षं मी अनुभव घेत होतो. पण त्या जीवनावरची कादंबरी लिहायला मी प्रथमच प्रवृत्त

झालो होतो. —— कादंबरीचा व्याप आणि अवकाशही मोठा असतो. कादंबरीतील नायकाचा जीवनपट कथेच्या तुलनेने कितीतरी मोठा आणि व्यमिश्र असतो. त्याचे दर्शन घडविण्यासाठी कथानक, घटना, प्रसंग, पात्रे इत्यादींची जुळणी जीवनाच्या दीर्घपटावर एका सूत्रात करावी लागते. कथेचा आवाका लहान असल्याने मी मध्यमवर्गीय पांढरपेशा जीवनावर सहज कथा लिहू शकेन, असा विश्वास होता. पण त्या जीवनावर कादंवरी लिहिण्यासाठी ते जीवन अधिक खोलात जाऊन समजून घेण्याची गरज मला वाटू लागली.

मध्यम वर्गीय जीवनशैलीत ग्रामीण जीवनशैलीपेक्षा प्रत्यक्ष घटना, शरीरनिष्ठ नाट्यपूर्ण प्रसंग तुलनेने कमी असतात. मध्यमवर्गीय घटना-प्रसंगांचा पोतही वेगळा असतो. ग्रामीण जीवनात शेते, रस्ते, पायवाटा, गाडीवाटा, राने, ओढेनाले, झाडी-झाडकांडे, डोंगरदरे, उघडा आभाळाखालचा निसर्ग अशा ठिकाणी घटना प्रसंग सहज घडतात. या घटना-प्रसंगात सक्रियता विशेष असते. त्याचा फायदा लेखन करताना लेखकाला घेता येतो. कृतींतून माणसांची मने दाखविता येतात. पण बुद्धिजीवी, मध्यमवर्गीय, पांढरपेशा जीवनातील घटना प्रामुख्याने घराच्या किंवा ऑफिसच्या चार भिंतीच्या आत घडतात. फार फार तर बागेत घडतात. त्यांचे स्वरूपही शारीरिक कृतींचे नसते. बौद्धिक वादाचे, चर्चेचे, शाब्दिक वादांचे, मानापमानाचे, काहीसे बुद्धिगम्य असते... त्यात पुन्हा 'कलेचे कातडे'चा नायक तर आयुष्याच्या अखेरच्या टप्प्यावर आलेला असल्याने जीवनात स्थिर झालेला, शब्दसृष्टीशी सतत खेळणारा, प्रत्यक्ष चरितार्थासाठीचा जीवनसंघर्ष ज्याचा संपुष्टात आलेला आहे, असा आहे. त्यामुळे या टप्प्यावर त्याच्या आयुष्यात फारशा कृतिशील किंवा जिज्ञासादर्शक, नाट्यपूर्ण घटना वगैरे असणं शक्यच नाही. मग कादंबरी लिहिणार कशाच्या आधारावर? —— अशी समस्या माझ्यासमोर उभी राहिली.

या समस्येचा विचार केल्यावर माझ्या असं लक्षात आलं की, आजवर ज्या पद्धतीचं कादंबरी लेखन मी केलं, त्या पद्धतीनं ही कादंबरी लिहिता येणं कठीण आहे. ह्या कादंबरीत घटना-प्रसंग असतील ते वेगळ्या पातळीवरचे असतील. ते बौद्धिक स्वरूपाचे नाट्य किंवा संघर्ष असलेले असतील. तथाकथित शरीर घटना-प्रसंग कमी असणार. ते नगण्य असणार. मध्यमवर्गीय प्रौढ साहित्यिकाच्या जीवनात बौद्धिक किंवा मानसिक पातळीवरच अधिक घडणार. त्यातूनच त्याची मानसिकता उलगडत जायला हवी. प्रस्तुत कादंबरीची भाषा वैचारिक नाट्य पेलवणारीच ठेवणे गरजेचे आहे. एकूणच कादंबरीची लयही संथ गतीची ठेवावी लागणार. —— या निर्णयाला येऊन मी कादंवरीच्या पहिल्या लेखनाला हात घातला.

जमतील तशी, सुचतील तशी सुटी, स्वतंत्र प्रकरणे लिहीत गेलो. पहिली घटना, दुसरी घटना, असा लेखनक्रम ठेवला नाही. नायकाच्या व्यक्तिमत्त्वाचे जे विविध पैलू दाखविण्याचे माझ्या मनात होते, ते ते पैलू आठवून, विशिष्ट काल्पनिक परिस्थिती व वातावरण मनाशी योजून, तेवढ्यापुरते ते ते लेखन पुरे करत गेलो.

पण अशा रीतीने मी लिहू लागल्याने केलेल्या प्रत्येक प्रकरणाचे स्थळ कादंवरीत नेमके कुठे आहे, याचा मला अंदाजच करता येईना. कारण या कादंबरीला सतत प्रवास करत पुढे

जाणारे, निश्चित स्वरूपाच्या कार्यकारण संबंधांवर आधारलेले कथानकच मी निर्माण करू शकलो नव्हतो. माझ्यासमोर फक्त वैशिष्ट्यपूर्ण स्वभावधर्माचा नायक होता. त्याच्या स्वभावाचे विविध पैलू दाखविणारे लेखन मला करायचे होते. म्हणून हे लेखन नायकाच्या स्वभावाच्या विविध पैलूंभोवतीच फक्त फिरत होते.'

अशा रीतीने बरेच लेखन केले. एका क्षणी मला अशी जाणीव झाली की मला अभिप्रेत असलेल्या नायकाच्या स्वभावाचे विविध पैलू आतापर्यंत आपण केलेल्या लेखनात येऊन गेले आहेत. — अशा रीतीने तथाकथित कथानक नसतानाही कादंबरीचे पहिले लेखन पूर्ण झाले.

पहिल्या लेखनाचा हा काळ फारच त्रासदायक ठरला. एक तर अशा प्रकारची विचार - गंभीर कादंबरी मी पूर्वी कधी हाताळली नव्हती. त्यात ती मध्यमवर्गीय कलावादी साहित्यिकाच्या जीवनावरची असल्याने मनावर ताण आलेला होता. त्यामुळे कादंबरी पूर्ण करू असा विश्वास वाटत नव्हता. हे पहिले लेखन पूर्ण व्हायला त्यामुळे एक-दीड वर्ष लागले. अर्थात या काळात पूर्वसूरींच्या गंभीर प्रकृतीच्या काही कादंबऱ्या वाचून काढल्या. त्यांच्या मांडणीशी, भाषेशी अधिकाधिक जवळीक साधून त्यांचा मनाला सराव करून घेण्याचा प्रयत्न केला.

अशा रीतीनं पहिले लेखन पूर्ण झाल्यावर नेहमीच्या सवयीप्रमाणे मी ते आठ दिवस बाजूला ठेवले. एखादे पहिले लेखन पूर्ण झाले की मी ते आठ दिवस बाजूला ठेवून इतर कामे करतो त्यामुळे मानसिक दृष्ट्या पहिल्या लेखनापासून मी काहीसा दूर जातो. अशी दूरता आल्यावर, आठ दिवसानंतर तटस्थपणे ते लेखन वाचता येते. एकूण लेखनाचे स्वरूप वस्तुनिष्ठपणे, तटस्थपणे पाहता येते. त्यातील त्रुटीही लक्षात येतात.

त्यानुसार आठ दिवसांनी मी ते लेखन वाचावयास घेतले. ते वाचल्यावर दोन-तीन बाबी लक्षात आल्या —

१) मला जे व्यक्त करायचे आहे, ते सर्व व्यक्त झाले आहे. पण त्याला कादंबरीचा ठोस आकृतिबंध प्राप्त होऊ शकला नाही. जे व्यक्त झालेले आहे तेही नीटपणे, रेखीवपणे, स्वच्छपणे व्यक्त झालेले नाही. त्याच्यात एक प्रकारचा भरडपणा, एक प्रकारचा ओरबाडलेपणा आला आहे. लेखनगत विषयाला मी पूर्णपणे एकाग्रपणाने सामोरा जाऊ शकलो नाही, याची जाणीव झाली. मनात जे काही आहे, ते व्यक्त करण्याची घाई, सर्व लेखनात आल्यामुळे ते असे झाले होते. दुसऱ्या लेखनाच्या वेळी हे करता येईल, असे मला वाटले.

२) पण असे झाले असले तरी, मी मनोमन योजलेले नायकाच्या व्यक्तिमत्त्वाचे पैलू ढोबळ स्वरूपात का होईनात पण व्यक्त झाले होते. त्यामुळे त्याच्या स्वभावाचा स्पष्ट परिचय मला झाला. आता वास्तवात हा नायक कुठे कसा वागू शकेल, याचे निर्णय मला स्पष्टपणे घेता येतील, असे वाटले.

३) तिसरी बाब म्हणजे घटना-प्रसंगही ठोकळेबाज वाटत होते. त्यात बारकावे भरून चैतन्य आणावे लागणार होते. तरच ते प्रत्यय देण्यायोग्य, जिवंत अनुभव देण्यायोग्य होणार होते.

मात्र मनात असलेल्या साहित्यकृतीचे एक अतिशय ओबडधोबड, प्राथमिक स्वरूपाचे

प्रतिरूप मी शब्दरूपात मनाबाहेर आणल्याने मला मोठे समाधान लाभले होते. पहिल्या लेखनाच्या वेळी मनावर एक फार मोठे ओझे असल्यासारखे वाटत होते, ते उतरले गेले, याचा आनंद काही वेगळाच होता... आता दुसरे लेखन कधीही करता येईल. ते ताणविरहित मनाने, प्रसन्न चित्ताने, सर्वांगीण चिंतन करून स्वस्थपणाने करता येईल, असे वाटू लागले.

अर्धी लढाई जिंकल्याने माझा उत्साह वाढला. दुसरे लेखन करण्यापूर्वी मला आणखी एक गोष्ट पूर्ण करून घ्यावी लागणार होती. — पहिल्या लेखनातील प्रकरणे सुटीसुटी वाटत होती. त्यांचा परस्पर आणि पूर्वोत्तर संबंध स्थापन करण्याची गरज होती. त्यासाठी प्रवाही स्वरूपाचे कथानक आणि त्यातील घटना-प्रसंगांचा कार्यकारणसंबंध आणि त्यांचे स्थळ, काळ, वेळ यांची निश्चिती करण्याची गरज वाटत होती. त्याशिवाय मला दुसरे लेखन करताच येणे शक्य नव्हते.

मनात केवळ एवढाच हेतू ठेवून मी पहिले लेखन पुन्हा एकदा वाचावयास घेतले. ते वाचताना जाणीवपूर्वक नसले तरी सुप्त-अर्धसुप्त मनात अगदी धूसरपणे, संदिग्धपणे कथानक तयार होऊ लागले. कोणते प्रकरण, कोणता घटना-प्रसंग अगोदर वा नंतर घालावा, त्या दोहोमध्ये कसे कार्यकारण संबंध स्थापन करता येणे शक्य आहे, हे निश्चित होऊ लागले. ते ते प्रकरण सुटे सुटे वाचताना मनात त्याच्या स्थळकाळाविषयीची एक प्रक्रिया सुरू झाली. त्यानुसार मी स्वतंत्र कागदावर नोंदी करत, प्रतिक्रिया व्यक्त करत, पुढची प्रकरणे वाचत जाऊ लागलो.

दुसरे वाचन संपविले. प्रकरणांचा पूर्वोत्तर क्रम स्थूलमानाने तयार झाला. त्यानुसार त्या सुट्या प्रकरणांना अनुक्रमांक टाकले. त्यानुसार प्रकरणे लावली. आरंभ, मध्य, शेवट मनोमन तयार केला आणि दुसऱ्या लेखनाकडे वळलो.

कादंबरीचे प्रत्यक्ष दुसरे लेखन सुरू केले. — पूर्वोत्तर संबंधासाठी प्रत्येक प्रकरणात काही नवी भर घालावी लागली. पूर्वी लिहिलेला काही मजकूर, काही घटना, एखादा प्रसंग तेथून काढून ते पुढे कुठे घालावयाचे हेही निश्चित करत चाललो. पात्रांचे स्वभाव पहिल्या लेखनात स्थूलपणे निश्चित झाल्याने त्यानुसार दुसऱ्या लेखनात त्यांना अधिक सजग करत गेलो, त्यांच्या स्वभावाचे कंगोरे अधिक लक्षणीय करत गेलो.

प्रस्तुत कादंबरीतील एकूण घटना-प्रसंग कुठे, कोणत्या परिसरात, कोणत्या विशिष्ट जागी केव्हा घडतात यांची मनोमन निश्चिती हळूहळू होत गेली होती. त्यामुळे दुसऱ्या लेखनात कादंबरीतील एकूण परिसर (लोकेशन), एकूण काळ, एकूण पात्रे, ही मनासमोर स्पष्ट स्वरूपात दिसू लागली. त्या सर्वांची स्थानिक विशिष्टता मनासमोर येऊ लागली. त्यामुळे दुसरे लेखन करता करताच काही अधिकही सुचू लागले आहे याची निश्चित कल्पना असल्यामुळे त्यातील घटना, प्रसंग, पात्रे, त्यांचे वर्तन यांना उठाव येण्यासाठी, त्यात सुसंगती येण्यासाठी अगोदरच्या प्रकरणात त्या अनुरोधाने अधिक भर टाकू लागलो. क्वचित त्याच्याही पाठीमागे जाऊन पूर्वीच्या प्रकरणांतही फेरफार करू लागलो, नवी भर टाकू लागलो. ही सगळी लेखनप्रक्रिया आणि मनात काहीबाही नवे सुचत जाणे, हे एकाच वेळी चालू होते. म्हणून हे दुसरे लेखन

सरळपणे, सुरूसुरू पुढे जात नव्हते; तर मागेपुढे, मागेपुढे पुन:पुन्हा जातयेत करावे लागत होते.

तरीही ही लेखन प्रक्रिया आनंददायी वाटत होती. काही घटना-प्रसंग अचानक सुचत होते, काही उतारे फारच छान जमत होते. हा प्रवास करताना मनावर ओझे नव्हते, ताण थांबून चिंतन करत होतो आणि पुन्हा लेखनाकडे वळत होतो. पहिल्या लेखनाच्या स्वरूपात मूलद्रव्य हाताशी असल्यामुळे आहे, हे कळले होते. त्या कल्पनेने आनंद होत होता. त्यामुळे लेखनाचा उत्साह वाढत होता. या सर्वांतून प्रवास करत दुसरे लेखन पूर्ण केले.

लेखन पूर्ण झाल्यावर मी सवडीने एकदा ते वाचले. यावेळी माझी केवळ वाचकाची भूमिका होती. किरकोळ शाब्दिक फेरफार करत, क्वचित वाक्यरचना बदलत ते वाचन पूर्ण केले. माझ्या दृष्टीने आता ही कादंबरी परिपूर्ण झाली होती. म्हणून माझ्या रितीनुसार मी ती माझ्या जाणकार, विश्वासू मित्रांना वाचायला दिली. त्यात तीन एक महिन्यांचा काळ गेला. बहुतेकांना लेखी स्वरूपात दोष, त्रुटी, विसंगती नोंदविण्याच्या सूचना दिल्या होत्या. त्यानुसार त्यांनी त्या दिल्या. त्यातील ज्या सूचना माझ्या मनाला पटल्या, त्यानुसार मी दुरूस्त्या केल्या. एक-दोन प्रकरणे वाढवावी लागली. काही ठिकाणी पाल्हाळ झाला होता, तर काही ठिकाणी अतिसंक्षेपाने उल्लेख आले होते. ते दोन्हीही प्रमाणबद्ध केले. त्यामुळे कादंबरीला नीटसपणा प्राप्त झाला. काही प्रकरणांत निवेदनाचे वर्चस्व जाणवत होते, त्यामुळे त्यांतील पात्रे लेखकाच्या इच्छेनुसार बाहुल्यासारखी वागताहेत, हे माझ्या लक्षात आणून दिले गेले होते. तिथे पात्रांना अधिक मुक्त करून, त्यांच्याच कृतीतून त्यांना बोलू दिले. यातूनच तिसरे लेखन होत गेले.

प्रसिद्ध झालेली 'कलेचे कातडे' ही कादंबरी म्हणजे हे तिसरे लेखनच होय. या कादंबरीच्या लेखनासाठी एकूण दोन वर्षांचा काळ गेला.

(फेब्रुवारी १९९८ लेखनाचा संकल्प; आणि जुलै १९९९ ते मार्च २००० प्रत्यक्ष लेखन.)

■

डॉ. आनंद यादव, ५, कलानगर, धनकवडी, पुणे ४३.

---

**शोकवार्ता**

*मराठीतील एक ज्येष्ठ समीक्षक प्रा. व. दि. कुलकर्णी यांचे शनिवार दि. २५ ऑगस्ट २००१ रोजी तसेच ज्येष्ठ कथाकार व्यंकटेश माडगूळकर यांचे मंगळवार दि. २८ ऑगस्ट २००१ रोजी पुणे येथे निधन झाले. हे दोघेही महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या निकटवर्तीयांपैकी होते. माडगूळकर तर अंबेजोगाई येथे १९८३ साली भरलेल्या अ.भा.म.सा. संमेलनाचे अध्यक्ष होते. या दोन्ही नामवंत ज्येष्ठांच्या निधनाचे तीव्र दु:ख म. सा. परिषदेचे कार्यकारी मंडळ व्यक्त करीत आहे. त्यांच्या वाङ्मयीन कामगिरीचा आढावा घेणारे लेख पत्रिकेच्या पुढील अंकात प्रसिद्ध केले जातील.*

*— संपादक*

---

# मार्क्सचा 'पाया आणि इमला' सिद्धान्त आणि साहित्य

❖

के. रं. शिरवाडकर

❖

कोठल्याही वैचारिक क्षेत्रात - मग ते आर्थिक वा सामाजिक वा कलाविषयक असो — मार्क्सवादाचा विचार करताना मार्क्सच्या 'पाया आणि इमला' (Base and Super Structure) सिद्धान्ताला अग्रक्रम देणे आवश्यक ठरते. कला, साहित्य आणि संस्कृती याविषयीचा आधुनिक विचार मार्क्सवादी दृष्टिकोन टाळू शकत नाही आणि त्यातील पाया-इमला सिद्धान्ताने अशा विचाराला सुरुवात होते. मार्क्सवादी साहित्यविचार साहित्याचा किंवहुना कोठल्याही मानवी क्रियेचा अलगपणे विचार करीत नाही. माणसाच्या महत्त्वपूर्ण क्रिया ऐतिहासिक एकतेने बांधलेल्या आणि एकमेकात गुंतलेल्या असतात अशी मार्क्सवादी भूमिका आहे. त्यानुसार कला आणि साहित्य एकूण जीवन अथवा एकूण संस्कृती यांपासून वेगळे करणे आणि त्यांचा पृथकपणे आस्वाद घेणे हे मार्क्सवादी दृष्टीत बसत नाही. असा साहित्याचा पृथक् आस्वाद अथवा आकलन हे जुजवी अथवा फसवे असणार असे मार्क्सवाद्यांचा वाटते.

आपल्या 'क्रिटिक ऑफ पॉलिटिकल इकॉनॉमी' या ग्रंथाच्या १८५९ साली लिहिलेल्या प्रस्तावनेत मार्क्सने आपले सामाजिक परिवर्तनाचे तत्त्वज्ञान मांडताना 'पाया आणि इमला' सिद्धान्त मांडला. पाया (Base) म्हणजे (त्या काळांतील) उत्पादन संवंधाची समष्टी (totality). उत्पादन संबंध हे मानवी जाणिवा अथवा दृष्टिकोन यांपासून स्वतंत्रपणे विकसित होतात. त्या त्या समाजातले वस्तुनिष्ठ भौतिक संबंध — जे सामाजिक उत्पादन, संपत्तीचा सामाजिक वाटप, विनिमय इ. प्रक्रियांशी संबंधित असतात — म्हणजेच त्या काळातील उत्पादन संबंध. मोठ्या शेतमालकाचे कष्टकऱ्यांशी प्रभुत्वाचे संवंध म्हणजे जमीनदारी आणि गिरणीमालकाचे कामगारांशी प्रभुत्वाचे संबंध म्हणजे भांडवलदारी. उत्पादन-साधने, उत्पादन-पद्धती बदलल्या, विकसित झाल्या की हे संबंध बदलतात, विकसित होतात. त्याची माणसांना जाणीव असते, किंवा ते जाणीवपूर्वकतेने प्रस्थापित होतात, विकसित होतात असे नाही. अर्थरचनेचे यंत्र सुरू झाले म्हणजे सामाजिक संबंधाची प्रकिया अपरिहार्यपणे सुरू होते. इमला (Super struture) म्हणजे तत्कालीन समाजाची आत्मसंबंधित (Interrelated) सामाजिक उभारणी. त्यामध्ये त्या काळातील राजकीय, वैधानिक, धार्मिक इ. संस्थांच्या, माणसांच्या अन्योन्य संबंधांचा आणि आध्यात्मिक जाणिवांचा (विचारधारा, भावना, परिकल्पना, तात्विक वा धार्मिक विचार इ.चा) समावेश होतो. या सर्वांसाठी कदाचित संस्कृती हा एक शब्द सावधानपूर्वकतेने वापरता येईल. इमल्याची उभारणी आर्थिक पायाच्या अनुषंगाने होत असते हा महत्त्वाचा मुद्दा. उत्पादन संबंधांची गोळा बेरीज म्हणजे त्या समाजाची आर्थिक रचना, सामाजिक रचनेचा पाया. या पायावर राजकीय, वैधानिक, सांस्कृतिक इमला उभा राहतो आणि त्याच्याशी

सुसंवादी अशा सामाजिक जाणिवांच्या श्रेणी (forms of consciousness) निर्माण होतात. अशा प्रकारे भौतिक जीवनातील उत्पादन पद्धती (models) सामाजिक, बौद्धिक वा सांस्कृतिक जीवनाला आकार देतात. या सगळ्या चर्चेवरून मार्क्सने एक महत्त्वाचा निष्कर्ष काढला की माणसांच्या जाणिवा (consciousness) त्यांचे अस्तित्व ठरवितात असे नसून त्यांचे सामाजिक अस्तित्व त्यांच्या जाणिवा ठरवितात. म्हणूनच प्रत्येक कालखंडात काही विशिष्ट जाणिवा विशेष प्रभावी ठरतात आणि त्यांचा आविष्कार कला आणि साहित्यात विशेष उठून दिसतो; किंवा तत्कालीन कला साहित्याच्या त्या प्रेरणा ठरतात. भक्तिभावना ही चार शतकांपूर्वी साहित्याला प्रेरक ठरली पण आज चार ओळीही तीवर कुणी लिहित नाही.

सामाजिक वास्तव ही एक गतिमान प्रक्रिया आहे असे मार्क्सवाद मानतो. म्हणूनच सामाजिक स्थित्यंतरांना आणि सामाजिक परिवर्तनांना माकर्सवादी विचारात सर्वाधिक महत्त्व आहे. आर्थिक रचनेतील उत्पादन-शक्ती आणि उत्पादन-संबंध समाजाच्या विकासकाळात सुसंवादाने प्रगत होत असतात आणि हा सुसंवाद् सामाजिक प्रगतीला कारणीभूत ठरतो, पण त्यामध्ये विसंवाद निर्माण झाला — आणि तो केव्हा तरी होतोच — म्हणजे संघर्षमय वातावरण निर्माण होऊन क्रांतिकाळ सुरू होतो. अशा वेळी पायातील बदलाचे ध्वनी-प्रतिध्वनी इमल्यात उठतात आणि क्रांतिकारक जाणिवा निर्माण होतात. अर्थोत्पादनात यंत्राचा शिरकाव झाल्याबरोबर सामन्तशाहीतील समाजरचना निरुपयोगी ठरली. प्रथम नव्या सामाजिक पुर्नरचनेची आवश्यकता जाणवू लागली आणि परिवर्तनासाठी आग्रह धरण्यात येऊ लागला. राजेशाहीचा काळ संपून लोकशाहीचा काळ आला. एका युगातील उत्पादन-संबंध दुसऱ्या युगातील प्रवेशाच्या दृष्टीने शृंखलाच झाले आणि त्या तोडण्यासाठी क्रांती आवश्यक ठरली. या क्रांतीच्या विचारधारांनी इमला — सारी संस्कृती दुमदुमली, भारली गेली.

पाया-इमला सिद्धान्तात आर्थिक घटकाला अतिरिक्त महत्त्व देण्यात आले आहे म्हणून मार्क्सवाद अस्वीकारार्ह आहे, आर्थिक गती ही सामाजिक स्थित्यंतराची एकमेव प्रेरणा मानणे चूक आहे अशा प्रकाराची टीका प्रस्तुत सिद्धान्ताच्या अनुषंगाने मार्क्सवादी विचारावर झाली. परंतु एंगल्सने (मार्क्सच्या मृत्यूनंतर) स्पष्टीकरण देऊन या सिद्धान्तात आर्थिक घटक (= पाया) हा एकमेव कर्ताकरविता असतो अथवा सामाजिक परिवर्तन म्हणजे एक यांत्रिक प्रक्रिया आहे असा त्याचा अर्थ लावणे म्हणजे त्याला हास्यास्पद करणे आहे असे म्हटले. एंगल्स लिहितो, ''आर्थिक परिस्थिती जरी पायाभूत असली तरी इमल्यातील विविध घटकसुद्धा ऐतिहासिक चळवळीवर प्रभाव पाडतात आणि काही वेळा तिचे स्वरूप ठरविण्यात महत्त्वाची भूमिका पार पाडतात.'' 'सारांश, आर्थिक घटक जरी पायाभूत असला तरी राजकारण, समाजकारण, धर्म, तत्त्वज्ञान, कला, साहित्य इ. समाजाच्या इतिहासात महत्त्वाची कामगिरी बजावतात.

सामाजिक परिवर्तनांची दिशा शोधणारा पाया-इमला सिद्धान्त इतिहासाच्या गाढ आकलनावर आधारलेला आहे. सिद्धान्ताची मांडणी मुळात रूपकात्म असल्यानें तिचे स्पष्टीकरण करताना काही त्रुटी भरून काढाव्या लागतात हे लक्षात घेणे आवश्यक आहे. परस्परांवर प्रभाव

टाकणारी पाया आणि इमला यांची कल्पना सचेतन आणि सेंद्रिय अशी धरावी लागेल. प्रत्येक कालखंडात माणूस आपल्या उपलब्ध उत्पादन-साधनांसह वास्तवाला/निसर्गाला आपल्या सोयीचा आकार देण्यात प्रयत्नशील असतो. त्यातूनच त्याची उत्पादन-क्रिया आणि अर्थरचना निर्माण होते. ही अर्थरचनाही आपल्या स्थैर्याला आणि प्रगतीला सोयीस्कर अशी संस्कृती निर्माण करते. अतिप्राचीन (primitive) समाजात उत्पादन-सामर्थ्य मर्यादित असल्याने आणि उत्पादन-संबंधही दृढ नसल्याने आपले भवितव्य आपल्या हातात नाही ही जाणीव स्थिर झाली होती. त्यातूनच देव, दैव, इ. जाणिवांचा जन्म झाला आणि त्याला संस्थांचे स्वरूप आले. साहित्यात नियतीचे सार्वभौमत्व प्रस्थापित करणारी शोकात्मिका, परमेश्वरी सामर्थ्य सांगणारी महाकाव्ये लिहिली गेली. पुढे शेतीव्यवस्था स्थिर होऊन सामन्तशाही प्रस्थापित झाली. तिचा विकास राजेशाहीत झाला. साम्राज्याचा अभिमान, देशनिष्ठा, राजाचे अधिपत्य इ. घटकांना अनुस्यूत करणारे राज्यशास्त्र आणि स्वामीनिष्ठा, वीरनायक, राजातील ईश्वरी अंश इ. परिकल्पना साहित्याच्या प्रमुख आशय बनल्या. या सर्व पर्यावरणात सामान्यजनांची व्यवहारपराङ्मुखता सोयीची असल्याने श्रद्धा आणि अंधश्रद्धा यांची चलती स्वागतार्ह होती. धार्मिक श्रद्धेतून भक्तिभाव जन्माला आला आणि तो भक्तिरूपाने साहित्याची प्रमुख प्रेरणा बनला. जोपर्यंत यंत्राधारित अर्थरचना उभी राहिली नाही तोपर्यंत भक्तिभावनेने जीवन आणि साहित्य भारावले होते. आज साहित्यात तिचा मागमूसही राहिला नाही असे म्हटले तरी चालेल. स्वामिनिष्ठा, राजनिष्ठा, पातिव्रत्य अशा कितीतरी परिकल्पना आज आपले सामर्थ्य हरवून बसल्या आहेत.

मार्क्सच्या 'पाया आणि इमला' सिद्धान्ताच्या समाजशास्त्रीय विवेचनातून निर्माण झालेल्या साहित्यविचाराच्या अनुषंगाने दोन महत्त्वाच्या मुद्यांचा उहापोह करणे आवश्यक आहे. एक आहे साहित्यातील वास्तववाद आणि दुसरा साहित्याची स्वायत्तता. दोन्ही बाबतीत बरेच गैरसमज दृढमूल झालेले आहेत आणि त्याची जबाबदारी काही अंशी मार्क्सवाद्यांवरही आहे. मार्क्सवाद साहित्यातील वास्तववादाला विशेष महत्त्व देतो हे खरे आहे; पण वास्तववाद, मार्क्सवाद्यांच्या दृष्टीने, म्हणजे वास्तवाचे हुबेहुब रेखाटन नव्हे; किंवा सामाजिक समस्यांचा ऊहापोही नव्हे. १९ व्या शतकात युरोपमध्ये वास्तववादी किंवा यथातथ्यवादी (naturalistic) दृष्टिकोनाचा अतिरेक झाला आणि साहित्याला (फोटोरेखनाचे) स्वरूप येऊ लागले. प्रत्यक्ष मार्क्स, एंगल्सनेच अशा यथातथ्यवादी साहित्यावर प्रतिकूल टीका केली आहे. आर्थिक-सामाजिक पाया इमल्यातील साहित्य क्षेत्रात लेखक स्वत:चे प्रतिबिंबन करतो अशी काही गैर समजूत यथातथ्यवादाच्या मार्क्सवादी-पुरस्कारात आहे. एंगल्सने म्हणूनच साहित्याच्या नमुना (type) दर्शनावर भर दिला. "माझ्या मते," एंगल्स म्हणतो, "प्रातिनिधिक (typical) परिस्थितीतील प्रातिनिधिक व्यक्तींचे चित्रण म्हणजे वास्तववाद." तेव्हा वास्तववादी चित्रण म्हणजे हुबेहूब चित्रण नव्हे हे स्पष्टच आहे. संपूर्ण मानवतेचे योग्य सादरीकरण करणे हा वास्तववादाचा केंद्रीय प्रश्न असतो, हा लूकाचचा इशारा या चर्चेत पुरेसा आहे. याच संदर्भात सामाजिक समस्यांची गर्जना-घोषणा केलेली मांडणी हीसुद्धा एंगल्सला अनावश्यक वाटली, अप्रस्तुत वाटली. मिन्ना काऊट्स्कीला लिहिलेल्या पत्रात त्याने स्पष्टपणे म्हटले आहे,

''सामाजिक संघर्षाच्या भावी ऐतिहासिक सोडवणुका तबकात घालून (लेखकाने) वाचकाची सेवा करण्याचे कारण नसावे.''

'इमला आणि पाया' सिद्धान्तात पायाला मर्यादित महत्त्व आहे. वस्तुत: येथे वापरलेल्या रूपकातच महत्त्व आणि मर्यादा स्पष्ट होतात. इमला स्वयंप्रभावी असतो आणि तोही पायावर प्रभाव टाकतो हे सिद्धान्ताच्या मांडणीतच स्पष्ट झाले आहे. म्हणूनच 'पाया आणि इमला' सिद्धान्त साहित्याची स्वायत्तता हिरावून घेत नाही. मार्क्सने ग्रीक कलेवर भाष्य करताना भौतिक परिस्थिती (जी अर्थरचनेची तत्काल निर्मिती असते) आणि कला यांचा सरळ संबंध अमान्य केला होता. साहित्यिकाचे लिखाण ही त्याची नैसर्गिक कृती असते असे मार्क्सचे मत होते, त्यामुळे साहित्यिकावर बाह्यबंधने घालण्याचा मार्क्सवादी साहित्य-विचारात प्रश्न येत नाही.

पाया-इमला सिद्धान्तात मानवी वास्तवाचे स्वरूप कसे व्यमिश्र असते, त्यात कोणकोणत्या शक्ती कशाकशा कार्यरत असतात आणि परस्परांवर त्या कशा आणि कितपत प्रभाव टाकू शकतात याची एक महत्त्वपूर्ण मांडणी केलेली आहे. साहित्य आणि कला इमल्याचा एक भाग असून इतर सर्व भागांप्रमाणे तो स्वायत्त परंतु संपूर्ण संकुलाशी सुबद्ध असतो. साहित्य स्वयमेव स्वतंत्र असले तरी जीवनाशी ते बांधलेले असते. म्हणूनच साहित्य आणि जीवन यांचे एक अतूट नाते असते.

कला आणि साहित्य ही संस्कृतीची अंगे असतात. साहित्याचा जन्म तत्कालीन संस्कृतीत होतो, तीमध्येच साहित्याचे पालनपोषण होते. साहित्याचा जीवनाशी संबंध येतो तो संस्कृतीद्वारा. कोठल्याही समाजरचनेत पायाभूत अर्थरचनेतून एक संस्कृती साकार होते आणि ती संस्कृती साहित्याला आशय, रूपरंग देते. संस्कृतीचे व्यमिश्र माध्यम मान्य केले म्हणजे कलास्वरूप सिद्धान्तात यांत्रिक वास्तववादाला वाव मिळत नाही आणि साहित्यावर स्वायत्ततेला बाधक बंधनेही पडत नाहीत. साहित्य संस्कृतीशी बांधले गेले म्हणजे सामाजिक परिस्थिती, व्यक्तीच्या आशा, आकांक्षा, चिरंतन मानवी मूल्ये, वैश्विक चिंतन ही सारीच साहित्याचा आशय बनतात.

■

डॉ. के. रं. शिरवाडकर
'विशाखा', ४८ नवकेतन हौ. सोसायटी, कोथरूड, पुणे ४११ ०२९

---

## स्वागत

- **लतादीदी आणि माझ्या कविता :** सुचित्रा कातकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १००.
- **सुजनरंग :** स्वाती कर्वे, अक्षयछाया प्रकाशन, पुणे, पृष्ठे १८८.
- **मन वढाय वढाय :** संजय लांडगे, मनोकामना प्रकाशन, इस्लामपूर, पृष्ठे ८०.
- **साधना जीवनाचा साक्षात्कार :** साने गुरुजी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर, पृष्ठे १७६.
- **पांडुरंगाची गीता :** पां. रा. देशपांडे, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर, पृष्ठे १२०.
- **विज्ञान आणि बुद्धिवाद :** अद्वयानंद राघोबा गळतळे, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर, पृष्ठे २७८.

---

# सीतेच्या वन्सबाई शान्ताबाई!

❖

डॉ. मो. गो. घडफळे

❖

*महाभारत कथेतील व्यक्तींचे एकमेकांशी असणारे नात्याचे संबंध निश्चित स्वरूपाचे आहेत. रामायणाच्या कथेतील नातेसंबंध मात्र विलक्षण वैविध्याचं दर्शन घडवतात. दशरथाला शान्ता नावाची मुलगी असल्याची एक दाक्षिणात्य परंपरा या लेखात मांडली आहे.*

''दिनूच्या सासुबाई राधाबाई' अशासारखं 'सीतेच्या वन्सबाई शान्ताबाई' हे काय एखादं नवीन नाटक आहे कां?'' ''नाही. रामायणातल्या सीतेच्या नणंदेविषयीचा हा लेख आहे.''

''काय म्हणता, सीतेला नणंद होती? रामाला बहीण होती? दशरथाला मुलगी होती?''

''तीनही प्रश्नांचं एकच उत्तर. होय, होय व होय.''

महाभारत व रामायण ही प्राचीन भारताची आर्ष महाकाव्ये; राष्ट्रीय महाकाव्ये. दोहोंत अनेक प्रकारचे भेद आहेत. महाभारत भारताच्या पश्चिम भागातले तर रामायण पूर्व भागातले. महाभारत अधिक इतिहासरूप, तर रामायण अधिक काव्यरूप. महाभारत अधिक वास्तवाचं दर्शन घडविणारं तर रामायण अधिक आदर्शाचा पाठ सांगणारं. या सगळ्या मुद्यांचा एखाद्या स्वतंत्र लेखात विचार करता येईल. या लेखापुरता या दोन महाकाव्यातला एक ठळक भेद सांगायचा झाला तर, महाभारतातल्या पात्रांची नातीगोती अगदी पक्की निश्चित आहेत. रामायण कथांमध्ये मात्र इतके वैविध्य आहे की, सांगता सोय नाही. व्यासांचा कर्ण, भासाचा कर्ण, भट्टनारायणाचा कर्ण, रणजित देसाई-कुसुमाग्रजांचा 'राधेय-कौन्तेय' आणि शिवाजीराव सावंतांचा 'मृत्युंजय कर्ण' यात 'स्वाभाविक' भेद असतील पण कर्ण युधिष्ठिराचा काका, मामा किंवा भाचाच होता किंवा द्रौपदी गान्धारीची मुलगी किंवा बहीणच होती असली अजब नाती तिथे कुठेच सांगितली गेलेली दिसत नाहीत. जास्तीत जास्त झाले तर भीष्मांचा विवाह झाला होता का नव्हता, अशा प्रकारची चर्चाच विद्वान मंडळी करू शकतील. रामायणाचे कथाप्रवाह मात्र याबाबत अगदी भिन्न नव्हे तर पुरते वि-भिन्न आहेत. ''एवढं सगळं रामायण ऐकून पुन्हा आपलं रामाची सीता कोण?'' हा मराठीतला खोचक प्रश्न अगदी शान्तपणानं ऐकून संस्कृत रामकथांचा अभ्यासक प्रतिप्रश्न करेल ''रामायण कोणतं?'' साधारणपणे वाल्मिकींची रामकथाच लोकांना माहीत असते; पण त्यातील तीन शाखांतही पूर्ण एकवाक्यता नाही. वायव्य पाठ वेगळा. दाक्षिणात्य वेगळा. मुंबईचं संस्करण वेगळं. त्यानंतर काश्मीरी रामायण, बंगाली रामायण, असमिया रामायण, खोतानी, तिब्बती आणि अशी कितीतरी प्रांतविशिष्ट रामायणे. बौद्ध रामायण, जैन रामायण, हिंदु परंपरेतील रामायण हे धार्मिक भेदही आहेतच. फादर कामिल बुल्के यांचा रामकथेवरचा प्रबंध निदान चाळून तरी पहावा. डोकं गरगरायला लागेल

एवढी रामकथेतील भिन्नता आपल्याला त्यात आढळून येईल.

आजच्या गाजत असलेल्या 'करोडपती' शैलीत अमिताभबाबूंनी ''रामकथाके अनुसार सीता कौन थी?'' असा 'आसान सवाल' त्यांच्या दमदार आवाजात विचारला आणि चार पर्याय ठेवले तरी नेमकी 'कोणती रामकथा' अभिप्रेत आहे, हे कळल्याखेरीज १) रामकी पत्नी? २) रावणकी कन्या? ३) जनककी अपनी कन्या? ४) पृथ्वीकी कन्या? या प्रश्नांना नेमकं उत्तर देता येणार नाही. बरं या चारातील एकही पर्याय निखालस चुकीचा नसल्यानं दोन चुकीचे पर्याय वगळताही येणार नाहीत.

पण हेही प्रकरण तूर्तास बाजूस सारून आपण मूळ विषय 'दशरथाची लोक शान्ता' याकडे वळू.

दाक्षिणात्य परंपरा - अयोध्येच्या दशरथ राजाला शान्ता नावाची मुलगी होती, अशी दाक्षिणात्य परंपरा गृहीत धरली तरी अनेक प्रकारचे प्रश्न उभे राहतात. ते असे १) दशरथाला मुलगी होती तर त्याचा निर्देश केवळ 'अ-पुत्र' (मुलगा नसणारा) असा न होता 'अनपत्य' (अपत्य नसलेला) असा कसा केला गेला? मुलगी ही देखील अपत्यच असते ना? २) या प्रश्नाला उत्तर म्हणून अशी कल्पना केली की, चारही मुले झाल्यानंतरच 'शान्ता' हे कन्यारूपी अपत्य झालं व त्यामुळे त्या आधी 'अनपत्य' असा उल्लेख केला गेला असावा. स्कंद पुराणाच्या नागर खंडानुसार (९८.२२) चार मुलगे झाल्यावरच दशरथाला एक सुंदर मुलगी झाल्याचा उल्लेख येतो.

''तथाऽन्या कन्यका चैव बभूव वरवर्णिनी ।
ददौ यां पुत्रहीनस्य रोमपादस्य भूपतेः ॥''

मात्र या पुराणात तिचं नाव 'शान्ता' असल्याचा निर्देश नाही. ही सुस्वरूप कन्या दशरथ राजा आपला अनपत्य मित्र रोमपाद याला दत्तक देतो. आता चार मुलांच्या नंतर झालेल्या आणि एकुलत्या एक असलेल्या मुलीला दशरथ दत्तक म्हणून दुसऱ्या कोणाला देईल का हा प्रश्न राहतोच. ३) बरं, शान्ता जर दशरथाची मुलगी होती तर ती नेमकी कोणत्या राणीपासून त्याला झाली? ४) कृत्तिवासाच्या बंगाली रामायणात सांगितले आहे की, अनपत्य दशरथ एकामागून एक लग्ने करत गेला. अखेर त्याच्या राण्यांची संख्या ७५० झाली. त्यातलीच एक भार्गवराजकन्याही होती. हिलाच सोन्याच्या कान्तीची सुंदर मुलगी झाली. यामुळेच तिचं नाव 'हेमलता' असं ठेवण्यात आलं. या 'हेमलता'लाच 'शान्ता' असंही म्हणत असत. दशरथाने ही मुलगी रोमपादाला दत्तक म्हणून दिली. ६) काही रामायणानुसार कैकयीला 'कुकुया' नावाची मुलगीही होती. हीच शान्ता. ती सीतेला 'तुझा रावणाशी संबंध होता' असं म्हणत सतत सतावत असे. थोडक्यात नणंद कुकुया सीतावहिनीला जाच करीत असे. या सर्व उलटसुलट निर्देशांमध्ये मुख्यत्वे दोन परंपरा असलेल्या आढळतात. रामायणाच्या वायव्य व पूर्वेकडच्या बंगाल प्रतींनुसार शान्ता ही दशरथाचीच औरस कन्या होती व ती त्याने अनपत्य असलेल्या आपल्या प्रियमित्राला म्हणजे अंगदेशच्या राजा दशरथाला दत्तक म्हणून दिली, असे म्हटले आहे. या उलट सर्व दाक्षिणात्य प्रतींमध्ये शान्ता ही अंगदेशचा राजा रोमपाद वा

लोमपाद याचीच पोटची मुलगी होती, असे वर्णिले आहे. या रोमपादाच्या राज्यात पाऊस न पडल्यानं दुष्काळ पडला. यावर उपाय म्हणून त्याचे पुरोहित व मंत्री त्याला विभाण्डक ऋषीचा मुलगा ऋष्यशृंग याला राज्यात पाचारण करावं व या ऋष्यशृंगाला रोमपादानं आपली मुलगी शान्ता देऊन आपला परजावईच करून घ्यावं, असं सुचवतात. ऋष्यशृंग ऋषीच्या कोपाला घाबरून स्वत: मंत्री व पुरोहित ब्रह्मचारी ऋष्यशृंगाला विवाहात पाडण्यासाठी घेऊन येण्यास धजावत नाहीत. ऋष्यशृंग आपला पिता विभाण्डक याच्याबरोवर आश्रमात कडकडीत ब्रह्मचर्य पाळत राहत असतो. वडिलांखेरीज त्याने इतर कोणी पुरुषही पाहिला नसतो. मग स्त्रियांचं दर्शन तर दूरच राहो. अशावेळी मंत्र्यांच्या सल्ल्याने रोमपाद गणिकांना पाठवून त्यांच्याद्वारा भुरळ पाडून ऋष्यशृंगाला आपल्या राजधानीत आणून आपली कन्या शान्ता त्याला देऊन घरजावई करून घेतो. इकडे अयोध्येला दशरथ राजा अनपत्य असतो. पुत्रप्राप्तीसाठी अश्वमेध यज्ञ करण्याचं तो ठरवतो. या अश्वमेधाचं प्रमुख असं ब्रह्मपुरोहितत्त्व ऋष्यशृंगाला द्यावं, असं दशरथाचे मंत्री व पुरोहित त्याला सांगतात. त्याप्रमाणे तो आपला सम्बंधी व मित्र असा जो रोमपाद राजा, त्याच्या अंगदेशाच्या राजधानीत येतो. रोमपाद ऋष्यशृंगाची व दशरथाची ओळख करून देतो. नंदपंडिताच्या दत्तकमीमांसेतही ही ऋष्यशृंगाची कथा आली आहे. रोमपाद आपल्या जावयाला ऋष्यशृंगाला म्हणतो —

''अयं राजा दशरथ: सखा मे दयित: सुहृत् ।
अपत्यार्थं ममानेन दत्तेयं वर वर्णिनी ।
याचमानस्य मे ब्रह्मन् शान्ता प्रियतरा मम
सोऽयं ते श्वशुरो धीर:, यथैवाहं तथा नृप: ।''

(हा दशरथ माझा मित्र, लाडका, हितचिन्तक आहे. अपत्यासाठी मागणी करणाऱ्या मला ही सुंदर कांतीची व त्याला स्वत:हूनही अगदी आवडणारी शान्ता ही कन्या त्यानंच मला दत्तक दिली. तो हा राजा, जसा मी प्रत्यक्ष सासरा तसाच तुझा अप्रत्यक्ष सासरा आहे.)

शान्तेसह ऋष्यशृंग दशरथाच्या वरोबर अयोध्येस जाण्यास तयार होतो. दशरथ नागरिकांना निरोप पाठवून अयोध्या नगरीं या दांपत्याच्या स्वागतासाठी सुशोभित करण्यास सांगतो. अंत:पुरातील स्त्रिया व दशरथाच्या राण्या शान्तेचा मानसन्मान करून तिला अंत:पुरात नेतात. यानंतर ऋष्यशृंगाच्या प्रमुख पौराहित्याखाली अश्वमेध याग पार पडतो. यानंतर ऋष्यशृंग दशरथासाठी पुत्रकामेष्टि यागही करतो.

वरील सगळ्या वर्णनात रोमपादाच्या राजधानीत आपल्या कन्येला पाहून दशरथाला प्रेमाचा फार मोठा उमाळा आला आहे किंवा अयोध्येत 'ताईसाहेब' माहेरी आल्या म्हणून अंत:पुरातल्या सेविकांना किंवा 'लेक' माहेरी आली म्हणून दशरथाच्या राण्यांना आनंदाचं उधाण आलं आहे, असा कोठेही निर्देश नाही. हे सगळंच विचित्र वाटतं.

इतरत्र सुमंत्र दशरथाला सनत्कुमारानं केलेलं भाकित सांगत असतो, असा उल्लेख आहे. सनत्कुमार भविष्यवाणी म्हणून सांगतात —

''इक्ष्वाकूणां कुले जातो, भविष्यति सुधार्मिक: ।

नाम्ना दशरथो राजा, श्रीमान् सत्यपराक्रमः ।
अंगराजेन सख्यंच तस्य राज्ञो भविष्यति ।
कन्या चास्य (च अस्य) महाभागा शान्ता नाम भविष्यंति ॥''

(इक्ष्वाकूंच्या कुळात अतिशय धार्मिक, धनवान व ज्याचा पराक्रम सफळ होतो, असा दशरथं नावाचा राजा होईल. राजाचे अंगराजाबरोबर मैत्रीचं नातं असेल आणि याला शान्ता नावाची भाग्यवती कन्या होईल.)''

या सगळ्या वर्णनात शेवटच्या चरणातले 'अस्य' हे पद संदिग्धच आहे. 'याला' म्हणजे नेमकी कोणाला कन्या होईल? दशरथाला का अंगराजाला? यापुढेही एके ठिकाणी निर्देश येतो, 'ऋष्यशृंगस्तु जामाता पुत्रांस्तव विधास्यति ।'

(ऋष्यशृंग हा जावई तुला पुत्र होतील असं करेल) आता जावई कोणाचा? रोमपादाचा का दशरथाचा?

रामायणाचे एक भाष्यकार गोविंदाचार्य म्हणतात, 'जामाता रोमपादस्य दशरथस्यापिवा । दशरथस्यौरसी कन्या, दत्ता रोमपादस्य''

(जावई रोमपादाचा किंवा दशरथाचा. शान्ता दशरथाची औरस कन्या. तशीच रोमपादाची दत्तक कन्या. म्हणूनच वरील एका वचनात रोमपादही जावयाला हेच म्हणतो, ''जसा मी तुझा श्वशुर तसा हा देखील'')

तिलकराम हा टीकाकारही म्हणतो, ''मित्राच्या जावयाला आपणही जावईबापू असेच म्हणत असतो.'' (मित्र जामाता स्वस्य अपि जामाता ।)

## उत्तररामचरितात दशरथाला चार अपत्ये असे विधान

उत्तररामचरितात भवभूतीने अगदी स्पष्ट भूमिका घेतली आहे. वायव्य व बंगाली प्रतींवर पूर्ण हवाला ठेवून तो म्हणतो —

''कन्यां दशरथो राजा शान्तां नाम व्यजीजनत् ।
अपत्यकृतिकां राज्ञे रोमपादाय तां ददौ ॥''

(''दशरथ राजाने शान्ता नामक मुलीला जन्म दिला. दत्तककन्या म्हणून त्याने तिला रोमपादाला दिले.'') पुढेही तो आपल्या नाटकात दशरथाचा उल्लेख 'पञ्चप्रसूतिः' ('चार मुले व एक मुलगी अशा पाचांना प्रसवणारा') असा करतो.

ईश्वरचंद्र विद्यासागर यांनी कलकत्त्याला मुद्रित केलेल्या उत्तररामचरिताच्या आवृत्तीत भवभूतीला आधारभूत असे रामायणातले काही श्लोक उद्धृत केले आहेत. पण ते रामायणाच्या मुंबईच्या संस्करणात कोठेही सापडत नाहीत.

**मग अखेर सत्य कोणते?**

''अखेर शान्ता ही औरस कन्या कोणाची? दशरथाची की रोमपादाची?'' उत्तर ''रोमपाद-दशरथाची?''

''म्हणजे काय बोलताय काय? दोघांची?''

''नाही हो! रोमपादालाही दशरथ असे दुसरे नाव होते.''

थोडक्यात दक्षिणी प्रथाच या बाबतीत योग्य आहे. शान्ता ही रोमपादाचीच औरस मुलगी; अयोध्येच्या दशरथाची नव्हे. पण हा सर्व गोंधळ दोन व्यक्तींना एकच नाव असल्यामुळं झाला आहे. डॉ. अशोक चतर्जी हे पद्मपुराणाचा अभ्यास करत होते. त्याच्या बंगाली हस्तलिखिताचं वाचन करत असताना व त्या संदर्भात एकूणच या विषयाचं संशोधन करताना त्यांना आढळून आलं की, वायुपुराण, ब्रह्मपुराण, हरिवंश इत्यादी ग्रंथात ज्या राजपरंपरा दिल्या आहेत त्यांना अनुसरून असं दिसतं की अंगदेशच्या चित्ररथ नावाच्या राजाला दशरथ नावाचा एक मुलगा होता. हा दशरथच रोमपाद किंवा लोमपाद या नावानंही विख्यात झाला. या रोमपाद-दशरथाला शान्ता नावाची मुलगी झाली. तिचा विवाह ऋष्यशृंगाशी करण्यात आला आणि जावईबापू ऋष्यशृंग यांच्याच अनुग्रहाने श्वशुरराज रोमपाद-दशरथ यांना 'चतुरंग दाशरथि' हा मुलगा झाला. हा दाशरथि म्हणजे 'राम दाशरथि' नव्हे. राम हा अयोध्यापती दशरथाचा मुलगा. मात्र अयोध्यापती दशरथ मोठ्या उदार मनाचा. मित्राचा जावई हा आपलाही जावईच अशा खाक्याने शब्दव्यवहार करणारा होता. भवभूती म्हणतो दशरथ नेहेमी म्हणायचा, "सीता ही रघुकुळातल्या इतर थोर नृपतींची सून असेल पण आमचा मित्र जनक याची मुलगी आम्हाला तरी मुलीसारखीच!"

(एषा रघुकुल महत्तराणां वधू: । अस्माकं तु जनकसुता दुहितैव)

आपली सून सीता मित्राची मुलगी असल्यानं तिला आपल्या मुलीसारखाच मानणारा दशरथ मोठ्या प्रेमळ मनाचा! "पण त्याच्या स्नेहल लाक्षणिक बोलण्याचा अर्थ न उमगून व ते वाच्यार्थानं घेऊन एखाद्यानं सीता ही दशरथाची मुलगी होती असा या नात्याचा रंग चढवून एखादं रामायण आपल्यासमोर ठेवलं नाही हे नशीबच म्हणायचं!" अशी एखाद्याची प्रतिक्रिया होणं अस्वाभाविक नाही. पण थांबा. 'सीता ही दशरथाची मुलगी आणि तरीही रामाची पत्नी होती.' अशा प्रकारचीही रामकथा आहे. तिचा परामर्श स्वतंत्र लेखात घेऊ. या लेखापुरते बोलायचे झाले तर शान्ता ही अयोध्यापती दशरथाची नव्हे तर रोमपाद-दशरथाची कन्या होती, हे समजून घ्यायला हवं. या शान्तेच्या पितृत्वाविषयीच्या मूलभूत संशोधनाचं श्रेय डॉ. अशोक चतर्जी या बंगाली अभ्यासकाला द्यायला हवं.

■

डॉ. मो. गो. धडफळे, २, यशोदीप-ब, ज्ञानल मंगल कार्यालयाजवळ,
रामबाग कॉलनी, सदाशिव पेठ, पुणे ३०. फोन : ४३३२०८१.

---

## स्वागत

- ❑ **शेरलॉक होम्सच्या पाच कथा :** अनुवाद — बिंबा निंबाळकर, पृष्ठे १२०.
- ❑ **अहल्याबाई होळकर :** म. श्री. दीक्षित, पृष्ठे ३२.
- ❑ **वळचणीचे पाणी :** प्राचार्य बाळ गाडगीळ, पुष्पक प्रकाशन, पृष्ठे ३८४.
- ❑ **कसरत :** सुशीला संकपाळ, पुष्पक प्रकाशन, पृष्ठे २७२.

**श्रीमती विजया श्रीराम खरे यांचेकडून खालील ग्रंथ सप्रेम भेट**

❑ **वाल्मिकी रामायण :** १ ते ५ खंड ❑ **महाभारत :** १ ते ११ खंड ❑ **श्रीमद् भागवत :** १ ते १६ खंड

# शेतीविषयक मराठी नियतकालिके



## डॉ. कमलाकर कृष्ण क्षीरसागर



*एकोणिसाव्या शतकात हिंदुस्थानात अतएव महाराष्ट्रात अवतरलेल्या प्रबोधनाचा एक सुपरिणाम म्हणजे येथे ज्ञानव्यापार सुरू झाला पाहिजे, अशी एक जाणीव एतद्देशीयांच्या मनात रुजली. अर्थात त्यासाठी एक चांगले हत्यार म्हणून एतद्देशीय मंडळींनी भराभर नियतकालिके सुरू केली. आरंभकालीन नियतकालिकांचा मूलोद्देश ज्ञानव्यापारच होता, हे त्यांच्या 'ज्ञानोदय', 'विविधज्ञानविस्तार', 'मराठी ज्ञानप्रसारक' इत्यादी नावांवरूनही सहज लक्षात येते. भारतीय ज्ञानपरंपरेचे नूतनीकरण व अद्ययावतीकरण करणे आणि मुख्य म्हणजे ज्ञानाची जीवनाशी सांगड घालून देणे ही काही उद्दिष्टे १९ व्या शतकातील मराठी नियतकालिकांनी स्वत:समोर ठेवलेली दिसतात. शेती व शेतकी शास्त्र हा आपल्या जीवनाचा एक महत्त्वाचा भाग असल्याने शेतीविषयक नियतकालिक निघणे आणि ती परंपरा आजवर टिकून राहणे अटळच आहे. वाङ्मयेतिहासात नियतकालिकांचा इतिहास येतोच. आणि शेतीविषयक नियतकालिके हे त्यातील एक दालन होय. प्रस्तुत लेखात शेतीविषयक नियतकालिकांच्या या परंपरेचे एक धावते चित्र पाहावयास मिळेल.*

***— संपादक***

कृषिविज्ञान साहित्यानेही मराठी साहित्यात मोलाची भर घातली आहे. संतसाहित्य थेट ग्रामीण जीवनाला भिडतं. ग्रामवासी त्या पाऊलवाटेने साहित्याभिमुख होतात. त्या दृष्टीने शेती साहित्यानेही ग्रामीण आणि नागरी जीवनामधील पूल जोडण्याचं काम मोठ्या प्रमाणात केलं आहे असं म्हटलं तर फारसं वावगं ठरू नये. १९ व २० मे २००१ या दोन दिवसांच्या मराठी विज्ञान परिषदेच्या, 'विज्ञान वाङ्मय निर्मिती' या विषयावरील पुण्यातील चर्चासत्राच्या निमित्ताने मी 'शेतीविषयक नियतकालिकांनी' विज्ञानवाङ्मय निर्मितीत उचललेल्या वाट्याचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आणि प्रस्तुत विधानाला पुष्टी मिळाली. तो आढावा येथे मांडण्याचा हा प्रयत्न आहे. मराठी कृषिवाङ्मयाची गंगोत्री प्रामुख्याने दोन स्रोतात आढळते. ती जवळजवळ समकालीन आहे. शेतकरी आणि शूद्रांचे कैवारी महात्मा फुले यांनी १८ जुलै १८७८ रोजी 'शेतकऱ्याचा असूड' उगारला आणि त्याच वर्षी १० मार्च १८७८ रोजी 'शेतकीविषयक तिमाही पुस्तक' या नावाच्या एका त्रैमासिकाच्या प्रथम अंकाचे प्रकाशन झाले. 'शेतकऱ्याचा असूड' या पुस्तकाचे पहिले दोन भाग नारायण मेघाजी लोखंडे यांनी 'दीनबंधू' नावाच्या पत्रात छापले. मात्र पुढचे दोन भाग छापण्यास सामाजिक कारणास्तव नकार दिला. या पुस्तकाचे लेखन सलग

झाले नाही. पुस्तकाचे भाग जसजसे लिहून होत तसतसे जोतीराव त्यांचे जाहीर वाचन करीत. १८७८ साली फुले मामा परमानंदाना मुंबईत भेटले तेव्हा 'असूड' लिहिण्याचा आपला विचार असल्याचे त्यांनी परमानंदांना सांगितले होते. पुस्तकाचा चौथा भाग १८८३ च्या एप्रिल महिन्यात मुंबई शहरात वाचला, अशी नोंद जोतीरावांनी तळटीपेत केली आहे. याखेरीज पुणे, ठाणे, जुन्नर, ओतूर, हडपसर, वंगणी, माळ्याचे कुरूल या गावीही त्यांनी या ग्रंथाचे वाचन केले होते. म्हणजेच या पुस्तकाचे स्वरूप काहीसे नियतकालिकासारखेच होते, असे म्हणावयास हरकत नसावी. मात्र त्याला नियतकालिकातील लेख-मालिकेचे स्वरूप लाभू शकले नाही. त्याचे कारण मांडणी व विचारपद्धतीमधील मतभेद. पुढचे भाग छापणे त्यामुळे लोखंडे यांनी नाकारले. यावर संतापलेल्या जोतिवांनी त्यांना 'भेकड छापखानेवाले' असे म्हटले होते.

यावरून 'शेतकऱ्याचा असूड' ही पुस्तिका प्रसिद्ध झाली त्याच वर्षी म्हणजे १८७८ साली शेतीविषयक नियतकालिक सुरू होणे हा काही केवळ योगायोग होता, असे नाही, असे लक्षात येते. ब्राह्मणांची व ब्राह्मणेतरांची — दोन्ही प्रकारची नियतकालिके शेतीविषयक मजकूर छापण्यास या ना त्या कारणामुळे वहुतेक उदासीन होती आणि इकडे शेतीविषयक नवज्ञान शेतकऱ्यांपर्यंत पोहोचविण्याची ऊर्मी काहीजण बाळगून होते. अशा परिस्थितीत केवळ शेतीविषयक नियतकालिक जन्मास येणे अर्थातच अपरिहार्य होते.

'शेतकऱ्याचा असूड' पुस्तकाची प्रस्तावना पाहिल्यावर त्यातील एकूण पाच प्रकरणातील विषय समजतात. त्यावरून तत्कालीन सामाजिक परिस्थितीवर अणि करपद्धती, शेतीतंत्रज्ञान, पीक परिस्थिती, पशुधन अशा शेतीविषयक प्रश्नांवर अणि खुद्द शेतकरीवर्गाच्या कौटुंबिक आणि सामाजिक स्थितीवर पुस्तकात सखोल व पोटतिडीकेने केलेला ऊहापोह यांची कल्पना येते. विशेषत: 'शेतकऱ्यांसहित शेतकीची हल्लींची स्थिती' या चौथ्या प्रकरणात हे विषय तपशीलाने मांडले आहेत. पुरुषांपेक्षाही शेतीकामात व घरकामात काकणभर अधिक कष्ट करणाऱ्या शेतकरणींच्या जीवनाचे स्पष्ट चित्रण आढळते.

प्रारंभीच्या काळातील शेतीविषयक नियतकालिकात सामाजिक व आर्थिक अशा कृषिघटकांची चर्चा बरीच असून पुढेपुढे कालांतराने केवळ कृषीपदवीधर, पीकपाणी व तंत्रज्ञानावर शास्त्रीय भर अधिक दिल्याचे दिसून येते. मात्र या सर्व लिखाणाला लेखनविषयक मूल्य निश्चितच आहे. त्यातूनच शेतकरी एका अंगाने साक्षर होत गेला व त्या माध्यमातून लिखित वाङ्मयाकडे त्याचा प्रवास काही प्रमाणात सुरू झाला. या प्रवासाचाच आढावा पुढील भागात घेतला आहे.

*पेरील जै शेतकरी न काही । तै खावयाला मिळणार नाही ॥*

(शेतकी आणि शेतकरी - १९१०)

*अन्नात साठल्या शक्ती, अन्नावीण विटंबना ।*
*वाढवा अन्न साऱ्यांनो, राष्ट्राचे बलवर्धना ॥*

(शेतकरी समाचार, १९४९... ब्रीदवाक्य)

*निजहित निजहाते साधणे मानवाने*
*विफल सकल होते मागणे दीनवाणे*

(भोळा शेतकरी ... प्रथमांक, डिसेंबर १९३२)

ही ब्रीदवाक्ये आहेत काही आद्य कृषिनियतकालिकांची. शेतीविषयक नियतकालिकांचा आढावा मागे जात १० मार्च १८७८ पर्यंत पोहोचताना दिसतो. आजच्या तारखेपर्यंत चालू असलेल्या 'शेतकी आणि शेतकरी' या 'डेक्कन ॲग्रिकल्चरल असोसिएशन' या तत्कालीन मुंबई इलाख्यातील शेतकरी संस्थेच्या शेतीविषयक मासिकाचा उगम 'शेतकरी' नावाच्या जानेवारी १८८३ मध्ये सुरू झालेल्या मासिकात सापडतो. म्हणजे या शेतकी मासिकाला आता ११८ वर्षे पूर्ण होत आहेत. अर्थात काही मोजके खंड पडले, परंत हस्तांतर होत होत ते आजही चालू आहे. पहिल्या 'पुस्तक मासिका'च्या अंकाचे संपादक होते, श्री. गणेश नारायण घोटवडेकर आणि सखाराम चिमणाजी गोळे. प्रकाशक होते, 'शेतीची सुधारणा करणारी मंडळी' ही उमरावतीची संस्था आणि 'पुणे वैभव छापखान्या'त हे २४ पृष्ठांचे चार आणे किंमतीचे मासिक ८.८ x ६.२ या आकारात छापले गेले. मात्र या पुस्तक मासिकाचे मे १९०९ पर्यंत नियमितपणे १७ वर्षे प्रकाशन झाल्यानंतर मे १९१० मध्ये त्याचे सर्व हक्कांनिशी हस्तांतरण झाले आणि ते समान उद्दिष्टे असलेल्या 'डेक्कन ॲग्रिकल्चरल असोसिएशन'ने चालवायला घेतले. त्याचे नामांतरण झाले, 'शेतकी आणि शेतकरी' असे. जून १९१० चा त्याचा पहिला अंक होय. या मासिकाचे उद्दिष्ट होते शेतकरी व शेतकी सुधारणा. हिंदुस्थानातल्या सर्व प्रांतांच्या वहिवाटी, सर्व मॉडेल फार्म्स्, शेतकी कॉलेजे आणि शाळातून मिळणारी माहिती, शास्त्रीय विषयांची निबंधरूप माहिती सामान्य शेतकऱ्यांपर्यंत पोहोचविण्याचा प्रयत्न हे 'मासिक पुस्तक' करीत होते. मासिकाच्या 'शेतकरी' या नावाखाली इंग्रजीत कंसात उल्लेख आहे, 'हिंदू ॲग्रिकल्चरिस्ट' असा. या मासिकाची हिंदी आवृत्ती १८९० मध्ये निघाली. नाव होते 'कृषिकारक'. या काळात मासिकाचे ८०० वर्गणीदार होते.

या 'शेतकी आणि शेतकरी' मासिकाचा त्याकाळी एक परिपाठ होता. तो म्हणजे दरवर्षीच्या पहिल्या अंकात मासिकाच्या गतवर्षीच्या कामगिरीचा अहवाल छापण्याचा. १९१७ च्या जूनच्या पुस्तकमासिकात दिलेल्या अहवालातील काही नोंदी उद्बोधक आहेत. १) पहिल्या जागतिक युद्धामुळे कागद महागला, परंतु वर्गणी वाढवावी लागू नये म्हणून कमी दर्जाचा (रफ) कागद वापरला. इतक्या अल्प किंमतीत ३२ पृष्ठांचे मासिक अवघ्या महाराष्ट्रात दुसरे नव्हते. २) मासिकाचे जनक, रा. गणेश नारायण घोटवडेकर यांचे जानेवारी १९१७ मध्ये दुःखद निधन झाले, ३) वर्गणीदारांची संख्या ४६०० वर पोहोचली. ४) सर्व महाराष्ट्र, उत्तर व दक्षिण हिंदुस्थानातील संस्थाने, मध्य प्रांत, निजामचे राज्य, दक्षिण महाराष्ट्रातील संस्थाने, किंबहुना जेथे जेथे मराठी बोलणारे लोक आहेत, तेथे सर्वत्र या मासिकाचा प्रसार झाला आहे. ५) महागाईमुळे २ खास अंक प्रतिवर्षाप्रमाणे काढता आले नाहीत. परिस्थितीनुरुप काढण्यात येतील. ६) 'सहकारिता व शेतकी' ही परस्पर भावंडे

आहेत. एकाशिवाय दुसऱ्याचे चालावयाचे नाही, हा सिद्धांत सर्वमान्य आहे. करिता गतसालापासून सहकारीविषयक मजकुराकरिता आम्ही सहा पाने दर अंकात राखून ठेविली.'' भारतातील कृषि-सहकारितेचा कदाचित हा उगम असेल. ७) नेहेमीप्रमाणे शेतकीविषयक प्रश्नांवर पुष्कळांकडून पत्रे आली... त्यांची माहितीपूर्ण उत्तरे सर्वांकरिता प्रसिद्ध केली. 'प्रश्नांच्या मार्मिक'पणाकडे लक्ष दिले असता शेतकीकडे लोकांचे किती आस्थापूर्वक व जिज्ञासापूर्वक लक्ष वेधले आहे, हे आढळून येईल. शेतकरी वाचकांना प्रतिसाद देण्यास व अडचणी विचारण्यास प्रवृत्त करण्याचे योजनाबद्ध प्रयत्न त्याही काळी होत होते, याचा इथे प्रत्यय येतो. ८) शेतकी म्हटले की, विषयांची पुनरुक्ती होणारच. ती करण्याचे काही कारण नाही, असे काही जणांचे मत असते. त्याविषयी या मासिकाच्या मतांची दखल घेणे उचित ठरेल. संपादक म्हणतात, ''महिने महाल शेतकीची व बागाईताची कामे दरसालप्रमाणे दिली आहेत. कित्येकांना सालोसाल आता शेतकी बागाईत कामे देण्याचे प्रयोजन नाही, असे वाटेल. परंतु आम्हास तर असे वाटते की, ऋतुमानाप्रमाणे व पावसाचे कमी-जास्त मानाप्रमाणे पिकांत व पिकांच्या जोपासनेच्या पद्धतीत फेरफार करणे अवश्य आहे. म्हणून सदर माहिती आम्ही दिली आहे व वाचकांनाही ती पसंत आहे.''

या अंकामध्ये इतर पिकांवरोबर काही विशेष लेखही होते. त्यात डॉ. हेरॉल्ड मॅन यांचा 'चहाची लागवड' पुरवणी स्वरूपात होता. त्याचप्रमाणे, त्यांचाच 'महाराष्ट्रातील खेड्यांची स्थिती' हा माहितीपूर्ण लेख होता. सहकारिता विभागात 'डेन्मार्क मधील अंड्यांची निर्यात करणारी सहकारी मंडळीं'च्या कामाची माहिती सविस्तरपणे दिली आहे. स्वत:पुरत्या अंडीनिर्मितीपासून मोठ्या प्रमाणात निर्यातीपर्यंतच्या उत्पादनापर्यंत केलेला विकास, अडचणी, शास्त्रीय पद्धतींचा विकास व वापर याबद्दल त्यात विवेचन आहे. १८७० ते १९१४ या वर्षांच्या वाटचालीत १४,००० पौंडावरून १,६५,००,००० पौंड अंडी निर्मितीचे शिखर गाठल्याचे दिसते. १८९० मध्ये 'डॅनिश एग एक्स्पोर्ट' या सहकारी संस्थेमुळे मध्यस्थ दलाल हटला व कोंबडीपालकांचे हित साधले. गुन्हेगारांस प्रथम ४ रु. २ आणे व दुसऱ्या गुन्ह्यास ८ रु. ४ आणे दंड होऊ लागला. दर्जेदार अंड्यांवर शिक्के मारण्यात येऊ लागले.

शेतीशिक्षण - तेव्हा शेतकी शिक्षणाबद्दलचे प्रकट झालेले विचार आजसुद्धा मार्गदर्शक ठरतील. ''खेड्यातील वातावरणास योग्य असाच अभ्यासक्रम हवा. क्रमिक पुस्तके तशीच हवीत. खेड्यातील वर्गात प्रशिक्षित असलेल्यांचीच खेड्यांतील शाळांवर शिक्षक म्हणून नेमणूक व्हावी. सुट्टीत शिक्षकांना प्रत्यक्ष शिक्षण द्यावे. शेतकी शाळात तयार होणाऱ्यांना शेतकी खात्यात घेऊ नये. त्यांना जमिनीवर पाठवावे. फक्त पुस्तकी ज्ञान नको.''

आजही चर्चेत असलेला 'शेती हा धंदा समजावा की नाही?' हा विषय जानेवारी १९१८ च्या अंकात चर्चिला गेला होता.

त्या काळच्या १७ व १८ जानेवारी १९१८ सालच्या कोपरगाव (जि. नगर) येथे भरविलेल्या शेतकी प्रदर्शनाची माहितीही उद्बोधक आहे. 'गोदावरी कनालवरील बागाईतदारांची सभा' या संस्थेने भरविलेल्या या सभेत जनावरे व पिके विभागात ५००

रुपयांचे वक्षीस ठेवले होते. त्यावेळी नांगरण्याची आणि 'गुळव्या-जुळव्यांची' शर्यत अशा दोन प्रकारच्या शर्यतींसाठी वक्षीसे होती. ५ गुंठे जमीन ३ वैल जोड्यांच्या नांगराने ३ इसमांनी खोल व सरळ तासात नांगरणे ही कसोटी होती. तर गूळ तयार करण्याची पद्धत व वेळ यांची शर्यत होती.

' या अंकाचे ८७ वर्षापर्यंत पुण्याहून चिकाटीने प्रकाशन झाल्यावर २ ऑक्टोवर १९९४ चा अंक वारामतीहून गांधीजयंतीच्या मुहूर्तावर प्रकाशित झाला. हे स्थलांतर झाल्यापासून कै. डॉ. दि. गो. तथा अप्पासाहेब पवार यांच्या संपादकत्वाखाली पुढील अंक प्रकाशित होऊ लागले. अंकाचा आकार वाढला. शारदा नगरच्या कृषिविज्ञान केंद्राच्या 'कृषि विज्ञान वार्ता' या द्वैमासिकाची जागा 'शेतकी व शेतकरी'ने घेतली. २००१ साली या मासिकाने ११८ वे वर्ष गाठले आहे.

अन्य जुनी शेतकी नियतकालिके :

१) सर्वात जुने त्रैमासिक : 'शेतकीविषयी तिमाही पुस्तक' या नावाच्या त्रैमासिकाचे प्रकाशन होते. श्री. काशिनाथ महादेव थत्ते आणि पुण्याच्या दत्तप्रसारक, शिळाछाप छापखान्यात त्याचे मुद्रण झाले होते. प्रथम अंक १० मार्च १८७८ रोजी प्रसिद्ध झाला. त्याची वार्षिक वर्गणी रु. दोन व फुटकळ अंकाची किंमत २ रुपये होती.

२) 'शेतकी सुधारणा' : या मासिकाचे संपादककर्ते होते प्रभाकर वाळकृष्ण लिमये. विजापूरच्या 'कृषिकर्मोत्तेजक सभे'चे चिटणीस होते व प्रकाशन विजापूरहून होई. पहिला अंक जून १८८८ मध्ये प्रसिद्ध झाला.

३) कृषिकर्म प्रकाश : हे मासिक कोल्हापूरचे. पहिला अंक जून १९०० मध्ये प्रकाशित. वार्षिक वर्गणी रु. २, पृष्ठे ३२, ९ x ६.२ आकार.

४) महाराष्ट्र कृषीवल : हे प्रथम मासिक होते, नंतर द्वैमासिक झाले व पुन्हा मासिक झाले. संपादक होते श्री. वामन रामचंद्र गाडगीळ. प्रथमांक २६ ऑगस्ट १९२२ (गणेश चतुर्थी) रोजी प्रकाशित झाला.

अंक ३७ पासून या मासिकाचे नामांतर झाले 'महाराष्ट्र कृषीवल शेतीचे नवीन मासिक.' अंक ४७ पासून ते बदलून 'महाराष्ट्र कृषीवल अर्थात महाराष्ट्र संपत्ती' असे झाले. परंतु, गरीव, शेतकरी व मध्यमवर्गीय यांस परवडावे म्हणून अंक ४३ पासून ते द्वैमासिक झाले. अंक ४७ मध्ये 'पुण्यातील धंदेवाल्यांची डिरेक्टरी' प्रसिद्ध झाली. पुन्हा १९३१ पासून नामांतर झाले 'चित्रमय कृषीवल.'

५) कोकण शेती समाचार : या मासिकाचा पहिला अंक नोव्हेंबर १९१७ साली सुरू झाला असावा असे दाते सूचित म्हटले आहे. कोकणातील शेती व जनावरांची जोपासना याविषयींची माहिती त्यात होती. रत्नागिरीला दत्तात्रय हरि लिमये यांनी संपादित केलेले हे मासिक यशवंत गोविंद गुर्जर यांनी सुरू केले.

६) भोळा शेतकरी : हे मासिक अमरावती येथून श्री. मोरेश्वर महादेव नायव यांनी डिसेंबर १९३२ मध्ये प्रथम प्रकाशित केले. त्यामध्ये शेती व शेतकरी हित, शेतीकायदा

आणि ग्रामसंघटन या विषयींचे लेख होते. विशेष म्हणजे कवितांचाही समावेश होता.

७) चतुष्पाद व कृषिकर्म : या मासिकाचा पहिला अंक ऑगस्ट १९१३ मध्ये हैद्रावाद येथून प्रकाशित झाला. ३४ पृष्ठांच्या अंकाची वार्षिक वर्गणी इंग्रजी शिक्क्याच्या रुपयात होती २ रुपये व निजामी रुपयात २ रु. ४ आणे.

''या सचित्र मासिकात जनावरांचे शारीरशास्त्र, रोग व उपाय, जोपासना, जातिवंत पैदास, गाईंचे सोईणपण, जमिनींचे प्रकार, विविध पिके, खते व तदंगभूत विषयांची सोपपत्तिक चिकित्सा'' यांचा समावेश असे.

८) आपली शेती : हे मासिक 'जी. अनन्तन्' या दक्षिणी टोपणनावाच्या पुण्यातील कै. श्री. अनंत गणेश देवकुळे या मराठी कृषिपदवीधर सामाजिक कार्यकर्त्याने अडतीस वर्षे सातत्याने चालविले. त्याचा पहिला ३२ पृष्ठांचा अंक जुलै १९४७ मध्ये प्रसिद्ध झाला. त्याची वार्षिक वर्गणी होती साडेतीन रुपये आणि फुटकळ अंक आठ आण्याला मिळे.

'आपला कामगार, शेतकरी, खेडूत, कृषिशास्त्र विशारद, भूमिपुत्र आणि शेतमजूर या अन्नदात्यांना साहाय्य करणे व एकत्र आणणे' असा या मासिकाचा हेतू होता. त्यांच्या प्राथमिक गरजा भागतील, समाज व सरकारी आघाडीवर दाद लागेल असा प्रयत्न करणे, पक्षभेदरहित वादविवादापासून अलिप्त राहून विधायक कार्य करणे यासाठी मासिकात एक 'गावकीचे पान' समाविष्ट केले होते. वर्ष २ अंक १०, एप्रिल १९४९ पासून आरंभीच्या पृष्ठावर 'हिंदुस्थानातील शेती करू इच्छिणाऱ्या प्रत्येक बांधवाकरिता साहाय्यभूत होणारे मासिक' असा उल्लेख असे.

श्री. देवकुळे यांनी स्वत:चे शेतीप्रयोग, माहितीचे संकलन, लेखन, मुद्रणशोधन, छपाई व वितरण इत्यादी सर्व कामे एकट्याच्या वळावर केली. कृषिसंशोधनासाठी त्यांनी चित्रशाळेचे कै. वासुकाका जोशी यांचे स्मरणार्थ त्यांच्या नावे एक कृषिसंशोधन संस्था स्थापन केली. कृषिक्षेत्रातील कोणत्याच विषयाचं त्याना वावडं नव्हतं. प्रारंभी प्रांतभर भटकून त्यांनी मातीचा अभ्यास केला. पाण्याची उपलब्धता व व्यवस्थापन यावर भर दिला आणि सामान्य शेतकऱ्याला उपयोगी पडेल अशा पद्धतींचा परिचय शेतकऱ्यांना करून दिला. कृषिपूरक कोंबडीपालन, ससेपालन, शेळीपालन, गोपालन, मधमाशा व रेशीमकीटक संगोपन त्याचप्रमाणे शेतकऱ्यांच्या मालाला योग्य भाव मिळणे, यासाठीही लेखन व मार्गदर्शन केले. त्यांच्या मासिकाचे वैशिष्ट्य म्हणजे जास्तीत जास्त प्रमाणात जोडाक्षरविरहित लिखाण, संवाद व चित्रे यांवर भर असे. आपल्या मासिकातून त्यांनी एक सदर चालविले, ते म्हणजे 'आपलं व्यासपीठ.' त्यात विविध प्रकारच्या दृष्टिकोनांची परखड चर्चा असे. वाचकांच्या प्रश्नांना उचित उत्तरे दिली जात. 'आपली शेती'चे काही विशेषांकही प्रसिद्ध झाले होते. १९४७ मध्ये सुरू झालेले हे मासिक १९८५ एप्रिल मधील गुढीपाडव्याला ३८ वर्षांनंतर बंद करण्यात आले. शेवटच्या अंकात श्री. दिवाण व. वि. यांचा मधमाशा पालनावरचा लेख, त्याचप्रमाणे गोरखचिंच, पक्षीकथा, कोंडाळ गवत अणि चांगले दूध असे लेख असून हा अंक शेवटचा आहे, असे निवेदन होते.



अनुक्रमणिका

९) शेतकरी मासिक : महाराष्ट्र शासनाच्या प्रसिद्धी विभागाने शेतकऱ्यांच्या हितासाठी व शेती सुधारणेसाठी पुण्याहून मे १९६५ मध्ये या मासिकाचा पहिला अंक प्रसिद्ध केला. तत्पूर्वी असे मासिक काढण्याचे प्रयत्न झाले व शेतकरी (मराठी) व 'फार्मर' इंग्रजी ही दोन मासिके निघत. परंतु १९६२ च्या चीन युद्धपरिस्थितीत ती बंद पडली व पुन्हा नियमित प्रकाशन १९६५ मध्ये प्रारंभापासून सुरू जाले. त्यावेळी डॉ. वा. ब. राहूडकर प्रभारी संपादक होते. नंतर १९६७ पासून डॉ. आ. बा. पाटील यांची पूर्णवेळ संपादक म्हणून रीतसर नेमणूक झाली. त्यांनी अमेरिकेमध्ये नेब्रास्का विद्यापीठात कृषिपत्रकारितेचा सहा महिन्यांचा अभ्यासक्रम पूर्ण केला होता. त्यांनी वृत्तपत्र संपर्क अधिकारी म्हणूनही कार्य केले होते. संपादनाची आवड व कृषिविषयक विपुल लेखन यामुळे त्यांना यशस्वीरीत्या जबाबदारी संभाळता आली. शेतकरी व कृषिप्रश्न यांविषयी त्यांचा सखोल अभ्यास व दूरदृष्टी असल्यामुळे उत्तम लेखक मिळविणे व वाचकवर्ग वाढविणे यासाठी त्यांनी योजनाबद्ध प्रयत्न केले व प्रारंभीची १९६७ ची चार हजार वर्गणीदारांची संख्या वाढवून ती १९८४ मध्ये एक लाखाच्या घरात नेली. प्रारंभी अचूक शास्त्रीय व तांत्रिक माहिती सुबोध भाषेत लिहिणाऱ्या लेखकांची वाण होती. लेखनासाठी फक्त शासकीय कर्मचाऱ्यांवरच अवलंबून राहावे लागे. प्राध्यापक व संशोधकांना लेखनाचा पुरेसा अनुभव नव्हता. परंतु त्यांना मार्गदर्शन मिळत गेल्याने चांगले लेखक उपलब्ध झाले. वाचक-वर्गणीदार वाढविण्यासाठी उत्तेजनार्थ योजना राबविण्यात आल्या. हंगामानुसार अनेक विशेषांक काढण्यात आले. आता वर्गणीदारांची संख्या ५०-६० हजाराच्या घरात असल्याचे कळते. संगणकाद्वारे अधिक माहितीची व्यवस्था आता वेबसाईटवर केली आहे.

१०) आ. बा. पाटील शेतकरी शिक्षण माला : 'शेतकरी' या शासकीय मासिकाचे यशस्वी संपादक डॉ. आ. बा. पाटील यांनी सेवानिवृत्तीनंतर मे १९९५ पासून या मासिकाची सुरुवात केली. एकाच विषयाला वाहिलेल्या प्रत्येक अंकात त्या त्या विषयांचे लेख पुस्तिका रूपात दहमहा प्रकाशित होतात. 'गांडूळ खत तंत्र', 'सोयाबीन उत्पादन तंत्र', 'उन्हाळी भाजीपाला तंत्र', कोरवाहू फळझाडे लागवड तंत्र', 'भाजीपाला टिकाऊ पदार्थ' असे अनेक विशेषांक आजवर प्रकाशित झाले असून आज त्यांचे वर्गणीदार २८,००० च्या घरात आहेत असे मुखपृष्ठावरच छापले आहे.

११) शेतकरी मित्र : श्री. मा. भी. सोलापुरे यांनी कोल्हापूर येथे जून १९४४ मध्ये सुरू केले. शेती, सहकार, व्यापार व ग्रामसुधारणा यांना वाहिलेले असे त्याचे स्वरूप असे. चौथ्या वर्षी त्यांनी दुग्धविशेषांक प्रसिद्ध केला. त्याची वार्षिक वर्गणी रु. ४ व फुटकळ अंकाची किंमत ४ आणे होती.

१२) शेतकरी समाचार : दाते सूचितील नोंदीप्रमाणे हे त्रैमासिक असावे. ते मध्यप्रांत व वऱ्हाड शेतकी खात्याकडून १९४८ पासून प्रसिद्ध होई. त्यांचे होळी व पोळा विशेषांक (एप्रिल ४९ व जुलै ४९) प्रसिद्ध झाले.

१३) शेतीभाती : परभणीहून मराठवाडा कृषिविद्यापीठाचे प्रसिद्ध होणारे हे मासिक,

मार्चमध्ये २५ व्या वर्षी अंक ९ व १० या जोडअंक या स्वरूपात प्रसिद्ध झाले असून त्याचे संपादक डॉ. भालचंद्र देशपांडे हे आहेत. या २५ पानी मासिकाची वार्षिक वर्गणी रु. ६०/- आहे.

१४) कृषिपत्रिका : डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांच्या विस्तार शिक्षण संचालयातर्फे या मासिकाचे यंदा ३० वे वर्ष आहे. प्रमुख संपादक आहेत श्री. आर. जी. देशमुख आणि १५ पृष्ठांच्या या मासिकाची वार्षिक वर्गणी रु. ३० आहे. अन्य विविध विषयांबरोबर नोव्हेंबर २००० च्या अंकात कृषिविषयक दहा निवडक वेबसाईट्सचा समावेश केला आहे.

१५) महात्मा फुले कृषिविज्ञान वार्तापत्र आणि सुगी : महात्मा फुले कृषिविद्यापीठातर्फे राहूरी येथून हे वार्तापत्र प्रसिद्ध होते. त्याचप्रमाणे 'सुगी' हे चार महिन्यातून एकदा प्रसिद्ध होणारे नियतकालिक हंगामांनुसार माहिती समाविष्ट करते.

१६) शेतकरी संघटक : हे पाक्षिक श्री. सुरेशचंद्र म्हात्रे संपादित करतात. ते दर महिन्याच्या ६ व २१ तारखेला प्रसिद्ध होते आणि शेतकरी संघटनेचे मुखपत्र असून अंगारमळा, आंबेठाण, जि. पुणे येथून प्रकाशित होते. यात मुक्त जागतिक व्यापार-धोरणाचा पुरस्कार केला जातो आणि शेतकऱ्यांची संघटना बांधण्याचे, त्यांचे प्रश्न सोडविण्याचे धोरण राबविले जाते. (वा. वर्गणी ५० रु., पृष्ठे ८)

१७) द्राक्षवृत्त : हे पुण्याच्या महाराष्ट्र राज्य द्राक्ष बागायतदार संघातर्फे प्रसिद्ध होते. द्राक्षलागवड या विषयाला वाहिलेल्या या मासिकाने २००१ साली २१ व्या वर्षात पदार्पण केले आहे.

१८) महाराष्ट्र सिंचन विकास : सिंचन संशोधन व विकासाला वाहिलेले हे त्रैमासिक पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय महाराष्ट्र शासनातर्फे गेली १३ वर्षे प्रकाशित होत आहे. ६४ पृष्ठांच्या या अंकात सिंचन व पाणी व्यवस्थापनाविषयी भरपूर माहिती दिली जाते. उपलब्ध पाणी व त्याचे व्यवस्थापन हा शेतकऱ्यांच्या जिव्हाळ्याचा प्रश्न उत्तम रीतीने शास्त्रीय व तांत्रिकदृष्ट्या हाताळला जातो.

१९) फळबागवृत्त : फ़ळे, फुले व भाजीपाला या विषयांच्या शास्त्रीय कृषिज्ञानाधारित लेखांचा समावेश असलेले हे पुण्याचे मासिक, कृषितज्ज्ञ श्री. दा. मो. रावतेकर संपादित करतात. ते दरमहा ५ तारखेस प्रसिद्ध होते व ३२ पृष्ठांच्या या मासिकाची वार्षिक वर्गणी रु. १२०/- आहे.

२०) मासिक पाणलोट तंत्र : महाराष्ट्रातील अवर्षण-प्रवण क्षेत्राच्या विकासाच्या दृष्टीने जल-व्यवस्थापनासाठी उपयुक्त तंत्रज्ञान व धोरण यासंबंधी माहिती देणारे हे १६ पृष्ठांचे मासिक, 'गंगोत्री विकास संज्ञापन प्रा. लि.' या संस्थेतर्फे दरमहा पुण्याहून प्रसिद्ध होते. श्री. राजेंद्र आवटे आणि श्री. संतोष गोंधळेकर हे मासिकाचे संपादन करतात.

२१) आदर्श शेती उद्योग : अभिनव शेती आणि शेती संलग्न उद्योग यांना वाहिलेले हे त्रैमासिक डॉ. महादेव ठोंबरे संपादित करतात व ते पुण्याहून प्रसिद्ध होते. प्रत्येक



अनुक्रमणिका

अंकाची किंमत ३० रुपये असून वार्षिक वर्गणी ८० रु. आहे. त्यांचं ब्रीदवाक्य आहे — *कृषिवल सेवार्थ — अन्नदाता सुखी भव ।* फेब्रुवारी, मार्च, एप्रिल २००० चा विशेषांक (५ वे वर्ष) गोसंवर्धनाला वाहिलेला होता. त्यात अनेक पशुतज्ज्ञांचे उद्‌बोधक लेख समाविष्ट केले आहेत.

२२) साप्ताहिक भूमाता निर्धार : हे साप्ताहिक सुप्रसिद्ध शेतीतज्ज्ञ डॉ. बुधाजीराव मुळीक यांच्या संपादनाखाली दर आठवड्याला प्रकाशित होते. १६ पृष्ठांच्या अंकाची किंमत ७ रुपये असून वार्षिक वर्गणी रु. ३०० आहे. विविध शेती विषयांवरील शास्त्रीय व तांत्रिक माहितीपूर्ण लेखांबरोबर शेती वा निसर्गविषयक कवितांचाही समावेश केला जातो. (१ ऑक्टोबर २००० रोजी वर्ष ५ वे व अंक ११)

२३) किसान शक्ती : शेती व शेतीपूरक विषयांचा समावेश असलेले हे मासिक श्री. बाळ दत्तात्रय पोतदार, संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक या नात्याने कोल्हापूरहून प्रकाशित करतात. मार्च २००१ चा अंक चौथ्या वर्षातील तिसरा अंक होय. किसानशक्तीच्या वतीने शेतकऱ्यांची चर्चासत्रेही भरविली जातात.

२४) गोडवा ऊसाचा : 'शेतकऱ्याने शेतकऱ्यांसाठी चालविलेले शेतीमासिक' असं ब्रीद घेतलेल्या मासिकाचा एप्रिल २००१ चा अंक म्हणजे ४ थ्या वर्षातील अंक चार होय. आजवर त्यांचे २८ अंक प्रकाशित झाले. प्रमुख संपादनाची जबाबदारी श्री. आर. एम. काटोले सांभाळतात व ते गोडवा कृषी प्रकाशनातर्फे पुण्याहून प्रकाशित होते. शेतकऱ्यांना वर्गणीतील ५० रुपयांची सूट दिली जाते. (वा. व. २५०) या मासिकातर्फे ऊसशेती (१९९७), खते व वी-बियाणे (१९९८), भाजीपाला (१९९८), दुग्धव्यवसाय (१९९९), फळबाग (१९९९), हरितगृह व फुलशेती (१९९९), दूध व्यवसाय (२०००) असे विविध विशेषांक प्रसिद्ध झाले आहेत.

२५) डाळिंब वृत्त : 'अखिल महाराष्ट्र डाळिंब उत्पादक संशोधन संघ, पुणे' यांच्या वतीने हे त्रैमासिक १९९४ पासून प्रसिद्ध होते. कृषिमहर्षी कै. डॉ. जी. एस. चिमा यांच्या १०१ व्या जयंतीच्या निमित्ताने प्रसिद्ध केलेल्या खास विशेषांकाचे प्रकाशन ऑगस्ट १९९५ मध्ये (वर्ष २, अंक ३) झाले. गणेश डाळिंब वाणाचे जनक डॉ. चिमा यांच्या जीवनकार्यावर प्रकाश टाकणारे तज्ज्ञांचे लेख या अंकात समाविष्ट केले आहेत. डॉ. चिमांच्या प्रयत्नांनीच महाराष्ट्राची फळबाग बहरली हे त्यातून स्पष्ट होते.

२६) स्वर्णरथ द्राक्षवार्ता : ऑक्टोबर-डिसेंबर २००० साली या त्रैमासिकाच्या दुसऱ्या अंकाचे खाजगी वितरण मुंबईच्या बी. ए. एस. एफ इंडिया लिमिटेडतर्फे झाले. प्रथमांक दि. २८ जुलै २००० रोजी प्रसिद्ध झाला.

२७) बळीराजा : 'आधुनिक व्यापारी शेतीचे मासिक' असे बिरुद मिरविणारे अत्यंत लोकप्रिय असे खाजगी प्रयत्नांतून गेली तीस वर्षे अव्याहतपणे प्रसिद्ध होणारे मासिक म्हणजे 'बळीराजा'.

शेतकरी कुटुंबात जन्मून शेतीची आवड व तळमळ कायम जपणाऱ्या प्र. बा. भोसले

या ध्येयवादी तरुणाने जानेवारी १९७० मध्ये 'बळीराजा' मासिकाची मुहूर्तमेढ रोवली. सरकोली या पंढरपूरजवळच्या आपल्या आडगावात सातवीपर्यंतचं शिक्षण धडपडत पूर्ण केलं अणि मोफत शिक्षणाची सोय सोलापूरला झाल्याने शेतकी शाळेचा दोन वर्षांचा अभ्यासक्रम त्यांनी पूर्ण केला. मिळतील ती पुस्तके वाचणे हा छंद जडला आणि त्यातूनच मनाची सामाजिक कार्यासंबंधीची जडणघडण झाली. कृषिमहाविद्यालयातील प्रत्यक्ष शेतीव्यवस्थापन आणि शेतीवाङ्मयाचे वाचन यामुळे शेतीमासिकाचे मनातील बीज अंकुरण्यासाठी अनुकूलता प्राप्त झाली. त्याला प्रत्यक्ष खतपाणी घातले श्री. मुकुंदराव किर्लोस्करांच्या डोळस विचारांनी. परिणामतः १९६८ साली शासकीय कृषी खात्यातील नोकरी सोडून किर्लोस्कर प्रेसशी संपक साधला. 'महाराष्ट्र भूमीत कृषिक्रांतीची चाहूल' यासारख्या लेखांनी आत्मविश्वास वाढवला. त्यात भर पडली 'किसान सोबती' नावाच्या कृषिदैनंदिनीने. शेवटी जानेवारी १९७० मध्ये 'बळीराजा' मासिकाचे स्वप्न साकारले.

काही वैशिष्ट्ये :

१) सर्वसामान्य शेतकऱ्याला शेतीशास्त्राची व तंत्राची माहिती सखोल व्हावी म्हणून सुबोध, सोप्या भाषेतील परंतु शास्त्रीय अचूकतेने परिपूर्ण असे सचित्र लेख सातत्याने देणे. त्यासाठी तज्ज्ञांशी संपर्क ठेवणे. अनाहूत लेखांनाही कठोर कसोट्या लावून त्यांची निवड करणे. अशा स्वीकृत लेखांचे प्रमाण जवळजवळ पन्नास टक्क्याहूनही अधिक असते.

२) किफायतशीर पिके व कृषिउद्योगांची चोखंदळपणे निवड करून त्यांची शास्त्रीय व तांत्रिक माहिती शेतकऱ्यांपर्यंत पोहोचविणे. त्यात वनशेती, औषधी, सुगंधी वनस्पती-फुलशेती, शेतीपूरक उद्योग इत्यादींचा समावेश केला गेला आहे.

३) प्रयोगशील व प्रगतीशील शेतकऱ्यांचे व्यावहारिक अनुकरणीय अनुभव, सहकारी विकास योजना, ग्रामविकास योजना यांची माहिती लेख, मुलाखती व पत्रांद्वारे मिळवून प्रसिद्ध करणे.

४) देश-परदेशातील नव्या कृषिसंशोधनाची माहिती देणे.

५) नैसर्गिक किंवा सेंद्रीय शेतीला प्राधान्य व त्यासाठी चर्चा शिबिरे यांची योजना.

६) प्रसिद्ध केलेल्या विविध लेखांसंबंधी व अनुभवांसंबंधी प्रतिसाद देण्यास वाचकांना उद्युक्त करणे, उत्तेजन देणे. प्रतिक्रिया व अडचणी विचारण्यात ग्रामीण शेतकऱ्यांच्या मनात एक प्रकारची भीती व संकोच असतो. तो घालविण्यासाठी उत्तम पत्रांना उत्तेजनार्थ बक्षीसांची योजना अंमलात आणली व वाचकांना लिहिते करून परस्परसंबंध प्रस्थापित करण्यात मोठ्या प्रमाणात यश मिळविले. अशा वाचकांची पत्रे लेखकांकडेही मोठ्या संख्येने जाऊ लागली.

७) नवीन पुस्तकांचा व उपक्रमांचा परिचय करून देणे, त्यांची विक्रीव्यवस्था करणे. आज बळीराजाकडे ५०० हून अधिक शेतीविषयक पुस्तके विक्रीसाठी उपलब्ध आहेत.

८) चर्चा शिबिरे व जनसंपर्कासाठी योजना अंमलात आणणे. २-३ वर्षातून एकदा अशी विविध विषयांची चर्चासत्रे बळीराजाने योजली व प्रदर्शने मेळावे यातूनही माहितीचे

आदान-प्रदान साधले.

९) कृषि-लेखकांना उत्तेजनार्थ पाच प्रकारचे पुरस्कार दिले जातात.

अ) बळीराजा - डॉ. राहुडकर कृषिग्रंथ पुरस्कार, ब) बळीराजा : कै. शंकरराव किर्लोस्कर समाजविकास पुरस्कार, क) बळीराजा : डॉ. डी. जी. कुलकर्णी कृषिलेखन पुरस्कार, ड) उत्तम कृषिलेख पुरस्कार व ई) जोडधंदेविषयक लेखांना पुरस्कार.

१०) खाजगी व्यक्तीने चालविलेल्या मासिकाची मोठ्या आकाराच्या बोर्डावरील जाहिरात बसस्टँड बाजारपेठा, रेल्वेस्थानक अशा ठिकाणी लावणारे हे एकमेव मासिक असेल.

११) बळीराजा मासिकाला १९९१ ते १९९७ पर्यंत सहा मोठे पुरस्कार मिळाले आहेत. त्याचप्रमाणे संपादक श्री. भोसले यांना महाराष्ट्र शासनाचा शेतीमित्र पुरस्कार (रु. २०,००० व सुवर्णपदक) १९९६ मध्ये मिळून त्यांच्या प्रदीर्घ कृषिकार्याचा गौरव झाला.

'बळीराजा' हे आजचे प्रचंड खपाचे एक अग्रगण्य कृषिनियतकालिक आहे.

शेतीविषयाला वाहिलेल्या या नियतकालिकांव्यतिरिक्त, इतर अनेक नियतकालिके व वृत्तपत्रे कृषिविषयक लेख प्रसिद्ध करतात. त्यामध्ये वैश्यसेवक, उद्यम, कारागीर, सुशील, समुद्र, समाजव्यवस्था, उपयुक्त ज्ञानसागर, मराठामित्र, वऱ्हाडशाप, सुज्ञानामृत, हिंद, वंजारी, व्यापारी महाराष्ट्र धंदेशिक्षण, महाबीजवार्ता, चित्रमय कृषि कोकण शेती, सृष्टीज्ञान, किर्लोस्कर वगैरे मासिकांचा उल्लेख करता येईल. (संदर्भ : दाते सूची, पुणे). पूर्वी 'पूना ॲग्रिकल्चरल मॅगझिन' या कृषिमहाविद्यालयाच्या इंग्रजी वार्षिकात काही कृषिविषयक लेख मराठीमध्येही प्रसिद्ध झाले आहेत. (मार्च १९६४) अशा मासिकाशिवाय कृषिदैनंदिनी व कॅलेंडर्सही आता दरवर्षी प्रसिद्ध होतात. उदा. किसान यात्रा कॅलेंडर (कालनिर्णय प्रकाशन)..

पशुसंवर्धन नियतकालिके :

१) श्वेतक्रांती : १९८४ मध्ये प्रारंभ झालेले हे द्वैमासिक श्रीरामपूरहून महाराष्ट्र पशुसंवर्धक संघटनेचे मुखपत्र म्हणून प्रकाशित होते. प्रमुख संपादक म्हणून श्री. अ. भा. तथा भाऊकाका आगाशे जबाबदारी सांभाळतात. मान्यवर लेखकांमध्ये, डॉ. वासुदेव सिधये, डॉ. प्र. अ. देवरे, डॉ. नितीन मार्कंडेय, डॉ. प्र. भ. देशपांडे, डॉ. एस्. जी. कुलकर्णी, डॉ. दिलीप खिरे, डॉ. बापूसाहेब भिकाने, डॉ. वि. ग. राऊळ, डॉ. पी. एम्. घळसासी, डॉ. बा. रा. मांगुरकर, डॉ. वा. ब. राहुडकर इत्यादींचा समावेश होतो. अनेक विशेषांक प्रकाशित झाले आहेत.

२) पशुपालक : हे महाराष्ट्र राज्य पशुसंवर्धन खात्याचे त्रैमासिक पुण्याहून प्रसिद्ध होते. प्रथमांक मार्च-एप्रिल १९९१ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यावेळी कार्यकारी संपादक म्हणून डॉ. श्रीरंग जंबगी हे काम पाहात होते. पशुसंवर्धनविषयक सचित्र लेखांचा या २६ पृष्ठांच्या त्रैमासिकात समावेश होतो. त्यामध्ये काही कवितांचाही समावेश आहे.

३) VHL बुलेटिन हे मराठीतील वार्तापत्र व्यंकटेश्वरा हॅचरिज्तर्फे पुण्याहून प्रकाशित होते. कोंबडीपालनाविषयीची माहिती त्यामध्ये देण्यात येते.

या लिखित कृषि वाङ्मयाशिवाय आज दूरचित्रवाणीमाध्यमही कृषिवाङ्मय निर्मितीत

सहभागी आहे. ETV वरील 'अन्नदाता' किंवा दूरदर्शनवरील 'आमची माती आमची माणसे' ही सदरेही महत्त्वाची आहेत.

महाराष्ट्राच्या कृषिजीवनात गेल्या शे-सव्वाशे वर्षांत खूपच बदल झालेला आहे. जोतिबांच्या नंतर कृष्णराव भालेकर, नारायणराव लोखंडे, शाहू राजे, महर्षि वि. रा. शिंदे, बाबासाहेब आंबेडकर, म. गांधी वगैरेंनी स्वातंत्र्यपूर्व काळात या उपेक्षित जीवनांगाकडे इतरांचे लक्ष वेधण्याचा मोठाच प्रयत्न केला. हरिभाऊ आपटे यांची 'काळ तर मोठा कठीण आला' ही कथा आणि शि. प. परांजपे यांचा 'खडी फोडणाऱ्याची गोष्ट' हा ललितनिबंध याद्वारा या जीवनांगाचे प्रमाण मराठी साहित्यात पदार्पण झाले. देशातील साडेसहा लाख खेड्यांची कैफियत म. गांधींनी मांडली, 'खेड्याकडे चला' असा संदेश दिला अणि मराठीत जानपद साहित्याचा प्रारंभ झाला. पुढे श्री. म. माटे, ग. ल. ठोकळ, र. वा. दिघे यांचे साहित्य प्रकाशात आले आणि ग्रामीण साहित्याची परंपरा सुरू झाली. मराठी साहित्याच्या दरबारात ग्रामजीवनाला मिळत चाललेली ही मान्यताच होय.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काँग्रेस आणि शेतकरी-कामकरी पक्ष यांनी या वर्गाच्या जागृतीचे कार्य केले. पंचवार्षिक योजना आल्या. त्या शेतीच्या दृष्टीने फारशा फायदेशीर नसल्या तरी त्यांची हरित क्रांती, श्वेतक्रांती होण्याला मदत झाली. शेती किफायतशीर नसल्यानेच शेतीला जोडधंद्याची आवश्यकता असल्याचे सांगितले जाऊ लागले. शेती कसण्याबाबत नव्या तंत्रपद्धती, यांत्रिक अवजारे, रासायनिक खते वगैरेंचे नवे भान शेतकऱ्याला दिले जाऊ लागले. त्यांची सहकारी चळवळ अस्तित्वात आली.

अशा घडत गेलेल्या सगळ्या बदलांचे प्रतिबिंब उमटावे तसे शेतीविषयक नियतकालिकांत उमटलेले नाही, ही वस्तुस्थिती आहे. मराठी साहित्यातही ग्रामीण साहित्याचे लेखन वाढीला लागले पण ग्रामजीवनाचा नेमका अन्वयार्थ लावणारे साहित्य एक माटे सोडले तर, १९७५-८० सालापर्यंत फारसे दिसत नाही.

जवळजवळ सर्वच शेतीविषयक नियतकालिकांनी शेतकऱ्याला शेती कसण्याबाबत मार्गदर्शन करण्याचीच भूमिका बजावलेली आहे. 'बळीराजा' आणि 'शेतकरी संघटक' हे दोन अपवाद म्हणून सांगता येतील. 'बळीराजा'ने शेतीविषयक मार्गदर्शनाबरोबरच शेतकऱ्याचे उद्बोधन करण्याचा प्रयत्न केला आहे. तर 'शेतकरी संघटक' शेती कसण्याविषयीचे मार्गदर्शन करीत नाही. त्याचा भर शेतकऱ्याला शेतीचे अर्थशास्त्र समजून देण्यावर आहे. त्याची दुःखे त्याच्याच शब्दांत सांगणारा एक 'अभिव्यक्ती विशेषांक'ही त्याने प्रसिद्ध केलेला आहे. इंडिया-भारत या द्वंद्वाचे शेतकऱ्याला अनेकविध अंगांनी ज्ञान देणाऱ्या अणि शेतीवर आधारित नवा अर्थवाद मांडू पाहणाऱ्या श्री. शरद जोशी यांचे लेखन हा या 'शेतकरी-संघटक'चा प्रधान आधार आहे.

■

डॉ. कमलाकर कृष्ण क्षीरसागर
१२९४, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे ४११ ००२. दूरभाष : ४४७१७५५



अनुक्रमणिका

# हा तों साहित्यकुसुमांचा आस्वादु।



## कै. चिं. नी.जोशी : एक मराठीसाहित्यसमर्पित प्राध्यापक



*('चिंतामण नीलकंठ तथा काकासाहेब जोशी : व्यक्ती आणि वाङ्मय' संपादक - प्रा. द. पं. जोशी, प्रकाशक - मराठी साहित्य परिषद (आंध्र प्रदेश), इस्लामिया बाजार, हैदराबाद - ५०० ०२७. पृ. २५२, मूल्य - रुपये दोनशे मात्र)*

हैदराबादेतील उस्मानिया विद्यापीठाची स्थापना स. १९१८ मध्ये झाली आणि उर्दू हे शिक्षणाचे माध्यम ठरविण्यात आले, ही त्या काळची महत्त्वपूर्ण घटना होती. उर्दूबरोबरच मराठीसारख्या देशी भाषांनाही स्थानिक मराठी भाषक नेतृत्वाच्या प्रयत्नांमुळे स्थान प्राप्त झाले आणि परिणामस्वरूप १९२०-२१ मध्ये मराठीचे पहिले प्राध्यापक म्हणून चिंतामण नीलकंठ तथा काकासाहेब जोशी यांची नियुक्ती झाली. १९२६ मध्ये त्यांची प्रोफेसर आणि मराठी विभागप्रमुख म्हणून नियुक्ती होईपर्यंतच्या काळात हैदराबादेत मराठी भाषा व साहित्य यांना पोषक अशा 'मराठी साहित्य परिषद' किंवा 'मराठी ग्रंथ संग्रहालय' यांसारख्या संस्थांच्या स्थापनेसाठी त्यांनी प्रयत्न केले. त्यांची आवश्यकता पटवून देणारी भाषणे केली, लेख लिहिले आणि त्या कल्पना प्रत्यक्षात आणल्या. अप्रत्यक्षपणे मराठी भाषकांच्या भावनांना संघटित रूप प्राप्त झाले. मराठी विभागाचा विकास आणि विस्तार होण्यासही त्यांची मदत झाली. उस्मानिया विद्यापीठाच्या प्रारंभ काळातच उर्दू व मराठी हस्तलिखितांचा संग्रह करण्याचे शासकीय धोरण राहिले. खेडोपाडी हिंडून हस्तलिखिते जमविणे हा सेवेचाच एक भाग बनला. शासनानेही त्यासाठी उदारपणे मदत केली. हस्तलिखितांचा शोध, त्यांचा अभ्यास व लेखन हा मराठी विभागाचा एक प्रमुख कार्यभाग बनला. विद्यापीठीय क्षेत्रात अपवादात्मक असणारी 'मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिका' हे दर्जेदार नियतकालिक म्हणजे या धोरणाचीच एक स्तुत्य परिणती होय.

पुढे मराठी विभाग प्रमुख झाल्यानंतर प्रा. जोशी यांनी आपल्या अध्यापनाच्या अनुषंगाने अनेक विषय व ग्रंथावर अभ्यासपूर्ण लेखन केले. त्या लेखनात त्यांचा व्यासंग, सर्व बाजू लक्षात घेऊन केलेली संयत टीका, मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्धीची तळमळ इत्यादी दिसून येतात. मराठीच्या अध्यापनाची तत्कालीन पद्धतीही त्यातून लक्षात येते. स्वाभाविकपणेच त्यांच्या विद्यार्थ्यांत मराठी हस्तलिखितांचा संग्रह आणि संशोधन यांविषयी रुची निर्माण झाली. डॉ. श्रीधरराव कुलकर्णी यांनीही आपल्या या गुरूचे ऋण मान्य केले आहे. ते म्हणतात, 'प्रत्येक सुटीत जुनी हस्तलिखिते गोळा करणे हे तर आमचे कामच होते आणि इतरांनी जमविलेल्या पोथ्यांचा अभ्यास कसा करावयाचा, हे त्यांनी आम्हाला वर्ग संपल्यानंतरच्या कालावधीत शिकविले' (पृ. २९). अध्यापनाला संशोधनाची जोड देणारा हा

त्या काळातील मराठीचा प्राध्यापक आजच्या काळात आदर्श ठरावा. उस्मानिया विद्यापीठात त्यांच्या काळात झालेल्या हस्तलिखिताच्या संग्रहात पुढे फारशी भर पडली नाही. साहित्य परिषेदत करण्यात आलेला संग्रहही राज्य पुनर्रचनेनंतर विभागला गेला.

प्रा. द. पं. जोशी यांनी 'कै. चिंतामण नीलकंठ तथा काकासाहेब जोशी : व्यक्ती आणि वाङ्मय' या शीर्षकाचा ग्रंथ संपादित केला असून तो हैदराबादेतील 'आंध्रप्रदेश मराठी साहित्य परिषदे' ने प्रकाशित केला आहे. प्रा. द. पं. जोशी यांनी प्रा. चिं. नी. जोशी यांचे वेगवेगळ्या ठिकाणी प्रसिद्ध झालेले लेख परिश्रमपूर्वक मिळवून ते या लेखात दिले आहेत. त्यामुळे प्रा. चिं. नी. जोशी यांच्या वाङ्मयीन कार्याचा एकत्र व साकल्याने विचार करता येणे शक्य झाले आहे. उपरोक्त विवेचन प्रस्तुत ग्रंथावर आधारितच आहे. कै. प्रा. जोशी यांनी १९३९ मध्ये 'मराठवाड्यातील पद्य वाङ्मय' हे पुस्तक प्रकाशित केले व त्यांनी आयुष्याच्या अखेरीस लिहिलेला 'श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन' हा प्रदीर्घ ग्रंथ त्यांच्या निधनानंतर १९४९ मध्ये प्रसिद्ध झाला. या व्यतिरिक्त अन्यही ग्रंथ प्रा. काकासाहेब जोशी यांनी लिहिले, असे प्रा. द. पं. जोशी यांनी म्हटले आहे. पण त्यांची यादी उपयुक्त ठरली असती. ग्रंथाच्या प्रारंभी कै. प्रा. जोशी यांचे चिरंजीव मेघश्याम जोशी, स्नुषा सौ. सुलोचनाबाई आणि डॉ. श्री. रं. कुलकर्णी यांचे आठवणीस्वरूप लेख आहेत. प्रा. द. पं. जोशी यांनी कै. प्रा. चिं. नी. जोशी यांच्या मराठीविषयक कार्याचा, त्यांच्या संशोधनाचा अभ्यासपूर्ण परिचय आपल्या 'थोर वाङ्मयोपासक प्रोफेसर चिं. नी. जोशी' या प्रदीर्घ लेखात करून दिला आहे. पुढे प्रा. कै. जोशी यांच्या वीस लेखांचा संग्रह व शेवटी श्री. म. माटे, रा. बा. माढेकर आणि आर. सिद्दिकी या सुहृदांची स्मरणे दिली आहेत. प्रा. काकासाहेब जोशी यांच्या वाङ्मयीन दृष्टिकोनाचा आणि मराठीविषयक धोरणाचा व्यवस्थित परिचय या संग्रहातील लेखाद्वारे होतो.

'मराठी वाङ्मयाची अभिवृद्धी' हा न्या. रानडे यांच्या मूळ निबंधावर आधारित विस्तृत लेख आहे. १८६४ पर्यंतच्या मराठी ग्रंथांची सूची न्या. रानडे यांनी तयार केली. या ग्रंथांची वैशिष्ट्ये टिपतानाच या कालखंडातील समीक्षात्मक लेखनाचा अभाव, धार्मिक पुस्तकातील भोळसटपणा आणि आचारविचारांचा अतिरेक यांचीही नोंद प्रा. जोशी यांनी केली आहे. मराठी भाषेचा होत गेलेला विकास आणि समकालीन परिस्थिती यांविषयी करावयाच्या प्रयत्नांचा विचार त्यांनी आत्मीयतेने केला आहे. त्या काळात नवी वाङ्मयनिर्मिती फारशी नव्हती. प्रा. चिं. नी. जोशी यांनी न्या. रानडे यांच्या निबंधाच्या आधारे छोटासा मराठी वाङ्मयाचा धावता इतिहासच तयार केला आहे. तो मराठी विषयाचा विशेष अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना निश्चितच उपयुक्त ठरला असावा. 'मराठीची मुंबई युनिव्हर्सिटीतून पुनरपि पीछेहाट' या लेखात मुंबई विद्यापीठात मराठीचे खच्चीकरण होत असल्याची खंत प्रा. जोशी यांनी व्यक्त केली आहे. मध्ययुगीन मराठीच्या संदर्भातही सुमारे शतकभरानंतर महाराष्ट्रातील तिच्या अभ्यासाची आणि अध्यापनाची अवस्था अशीच केविलवाणी झालेली आहे. कमी श्रमात अधिक लाभ मिळविण्याच्या वृत्तीमुळे हे सर्व घडत असल्याने त्याविषयीचे दु:ख अधिकच तीव्र बनते.

इतिहासाची अशी चमत्कारिक पुनरावृत्ती आज घडत आहे.

प्रा. चिं. नी. जोशी यांनी मराठी वाङ्मयोतिहासाची धावती रूपरेखा तयार केली. विद्यापीठातून होणाऱ्या मराठीच्या पीछेहाटीमुळे व्यथित होऊन वस्तुस्थिती व तीवरील उपाय जाणकारांपुढे मांडले. मराठी भाषेचा अभ्यास व प्रसार होण्यासाठी ग्रंथ संग्रहालयांच्या स्थापनेची गरज स्पष्ट करून त्यासाठी हैदराबादेत प्रयत्नही केले आणि हे सर्व उस्मानिया विद्यापीठात मराठी विभागप्रमुख म्हणून नियुक्ती होण्यापूर्वी केले, हे महत्त्वाचे आहे. उस्मानिया विद्यापीठातील मराठीच्या जागेसाठी झालेली त्यांची निवड किती सार्थ होती, हे त्यांच्या मराठीविषयक अभ्यासातून, संशोधनातून आणि तिच्या अभिवृद्धीच्या आस्थेतून लक्षात येते.

'हैदराबादेमध्ये मराठी ग्रंथसंग्रहालयाची स्थापना' या विषयावर लिहिताना आपण आंध्रप्रदेशीय असून येथे महाराष्ट्र ग्रंथसंग्रहालय कशासाठी असा प्रश्न करून आपण महाराष्ट्रीय व मराठी कसे आहोत, याचे अनेक पुरावे प्रा. जोशी यांनी मांडले आहेत. बिदर, मराठवाडा, आदि प्रदेश निजामाच्या अंमलाखाली असल्यामुळे तेथील ऐतिहासिक स्थळे व संतकवी यांच्याशी आपले नाते व त्यांच्याविषयी वाटणारा अभिमान त्यांनी व्यक्त केला आहे. या भाषणातील लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी की, प्रा. जोशी यांनी सर्व मध्ययुगीन ग्रंथकारांची नावे घेतली असून आधुनिक काळातील एकाही ग्रंथकाराचा उल्लेख त्यात नाही. कदाचित हे सर्व उल्लेखित कवी निजामाच्या अंमलाखालच्या प्रदेशातील असल्याने त्यांचा विचार त्यांनी केला असावा. 'लेंभे यांची कविता' या लेखात लेंभे या आधुनिक कवीची वैशिष्ट्ये त्यांनी सांगितली आहेत. लेंभे यांनी भाषांतरित कविता न करता प्रा. जोशींच्या मते, संस्कृत व इंग्रजी काव्यांपासून स्फूर्ती घेऊन, नवीन विषयांवरील स्वतंत्र काव्यरचना केली, हे समकालीन पार्श्वभूमीवरील त्यांचे आगळेपण होय.

उस्मानिया विद्यापीठातील व्याख्यानमालेतील भाषणात प्रा. जोशी यांनी भास्कर भट्टाच्या 'शिशुपालवध' या काव्याचा परिचय करून दिला आहे. परंतु त्यानंतर याच विषयावर लिहिलेल्या निबंधात प्रा. जोशी यांनी प्रस्तुत काव्याचा सविस्तर आणि अभ्यासपूर्ण विचार केला आहे. संपादकांनी हे दोन्ही लेख सलग दिल्याने या काव्याचा सर्वांगीण परिचय होण्यास मदत झाली आहे. 'भाषादृष्ट्या रघुनाथ पंडित आधी की मोरोपंत' या विषयावरील वादानंतर प्रा. जोशी यांनी या विषयावरील आपले विचार प्रस्तुत लेखात व्यक्त केले आहेत. त्यांनी प्रा. प्रियोळकरांचे 'रघुनाथ पंडित हा शिवकालीन कवी होता' हे मत उचलून धरले असून त्यासाठी पोषक मार्मिक उदाहरणे दिली आहेत. आता रघुनाथ पंडित हा दक्षिणेतील शिवकालीन मुत्सद्दी होता, हे मत मान्य झालेले आहे. कवी आनंदतनय हाही शिवकालातील कवी दक्षिणेत होऊन गेला. हे उभय कवी शिवकालीनच होते. आजच्या काळात हे वादविषय गैरलागू झाले असले, तरी तत्कालीन उपलब्ध होणाऱ्या हस्तलिखितांचा अभ्यास करताना त्याच्या कर्त्याचा जन्म, मृत्यू काल, गुरूपरंपरा इत्यादींच्या निश्चितीची ती गरज होती.

उस्मानिया विद्यापीठात मराठी, तेलगू, कन्नड इत्यादी भाषा शिकविल्या जात. या सोयीचा लाभ घेऊन ज्ञानेश्वरीतील द्राविडी शब्दांची विद्यार्थ्यांकडून निवड करवून घेतली व प्रा. जोशी

यांनी त्या आधारे चर्चा घडवून आणली व निबंधलेखन केले. कन्नड वा तेलगू याऐवजी 'द्राविडी' या शब्दाचा त्यांनी केलेली योजना अन्वर्थक वाटते. तेलगु व मराठी या भाषा समकालीन असल्याने तेलुगूचा फारसा प्रभाव जाणवत नाही, पण तुलनेने कन्नड ही अधिक प्राचीन भाषा आहे. ज्ञानेश्वरीतील निवडक ६७ कन्नड शब्दांची यादी प्रा. जोशी यांनी पुढे दिली आहे. 'निशाण' या फार्शी शब्दाचा अर्थ 'झेंडा' असा आहे. पण 'ज्ञानेश्वरी'त तो 'वाद्यविशेष' या अर्थाने दिल्याची नोंद त्यांनी केली आहे. तो शब्द कन्नडमधील 'निस्साळ' या शब्दावरून आल्याचे अलीकडे निश्चित झालेले आहे. प्रा. चिं. नी. जोशी हैदराबाद-मराठवाडा परिसरात राहावयास गेल्यानंतर तिकडील भाषा-विशेष त्यांना जाणवणे साहजिक हाते. ते त्यांनी 'मराठवाड्यातील मराठी बोलीचे विशेष' या त्यांच्या लेखात टिपले आहेत. आपल्या विद्यार्थ्यांना त्यांच्या परिसरातील बोली भाषेचा अभ्यास करण्याची प्रेरणाही त्यांनी दिली होती.

मध्ययुगीन मराठी वाङ्मयातील अनेक वादविषयांपैकी 'सांप्रदाय परिमळ' या ग्रंथाचा कर्ता चिरंजनमाधव की निरंजनदास हा एक होता. प्रा. चिं. नी. जोशी हे निरंजनमाधवाच्या पक्षाचे होते. त्यांनी आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ 'सांप्रदाय परिमळ' आणि निरंजनमाधवाचे अन्य ग्रंथ यांची तुलना केली. त्या दोन्ही ग्रंथातील विशिष्ट शब्दांची वारंवारिता, वाक्प्रचार, म्हणी, व्याकरणविशेष, संस्कृतप्रयोगयुक्त रचनापद्धती, संस्कृतमधील मथळे आणि अर्पणे यांची योजना, अन्य कवींच्या ग्रंथांचे व पौराणिक ग्रंथांचे उल्लेख, तत्त्वज्ञान इत्यादींचे पुरावे त्यांनी मुळातून सादर केले आहेत. त्यामुळे 'सांप्रदायपरिमळ' कर्ता निरंजनमाधव या पक्षास बळकटी आली आणि तेच मत आता ग्राह्य मानले जात आहे. त्यामुळे प्रा. पोतदार आणि प्रा. पंगु यांची काल्पनिक व तर्काधारित मते आपोआप बाजूस पडली आहेत. आपली बाजू मुद्देसूदपणे विशद करण्याची त्यांची हातोटी त्यांच्या व्यासंगी वृत्तीची निदर्शक आहे.

हस्तलिखितांचा शोध घेताना प्रा. काकासाहेबांची चिकाटी व घेतलेले परिश्रम विलक्षण आहेत. 'कृष्णामृत नट', 'सुगमबोध' किंवा 'वेदान्तप्रक्रिया' हे ग्रंथ त्यांनी वेगवेगळ्या ठिकाणांहून आणलेल्या गठ्ठ्यांतून जमविलेल्या सुट्या पानांची जुळणी करून साकार केलेले आहेत. 'कृष्णामृत नट' हा सुमारे १९ हजार ओव्यांचा ग्रंथ असून त्याचे स्वरूप 'दासविश्रामधामा'प्रमाणे सर्वसंग्राहक आहे. अन्य ग्रंथ तत्त्वज्ञानात्मक आहेत. हरिपंडित या कर्नाटकातील नरगुंद या गावच्या कवीच्या भागवताच्या एकादशस्कंधावरील समश्लोकी टीकेचा ग्रंथ आहे. पण त्याचे फक्त पाच अध्याय उपलब्ध झाले. क्र. १९ ते २२ हे 'ज्ञानेश्वरी' विषयक लेख आहेत. न. चिं. केळकर यांच्या 'ज्ञानेश्वरी सर्वस्व' या ग्रंथावरील समीक्षणात दोषदर्शन करताना वा मतभेद व्यक्त करताना चिं. नी. जोशी यांनी केलेले विवेचन आणि केळकरांनी त्यांस दिलेले उत्तर, हे लेखक-समीक्षक यांनी परस्परांबद्दल आदरभाव ठेवून केलेल्या चर्चेचे एक उत्तम उदाहरण म्हणून सांगता येईल. या चर्चेतील विषय आता इतिहासजमा झाले आहेत. 'ज्ञानेश्वरीविषयक चर्चा' या लेखात प्रा. जोशी यांना नव्याने उपलब्ध झालेल्या ज्ञानेश्वरीच्या पोथ्यांतील पाठभेदांची चर्चा आहे. पुढच्या लेखात प्रा. पारसनीस-मोडक संपादित ज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायाचे परीक्षण येते. 'ज्ञानेश्वरी व समाजस्थिती' या लेखात 'ज्ञानेश्वरी'च्या

ओव्यांतून आलेले स्त्रियांचे उल्लेख व समाजस्थिती यांचे दर्शन घडविले आहे. 'मराठवाड्यातील प्राचीन हस्तलिखित मराठी ग्रंथ व त्यांचे संशोधन' हे आकाशवाणीवरील प्रा. चिं. नी. जोशी यांचे भाषण त्यांच्या निधनाआधी (निधन १९४९) पाच वर्षे केलेले आहे. गेल्या पन्नास वर्षांत प्रा. जोशी यांनी निर्देशित केलेल्या हस्तलिखित संग्रहांचा शोध मराठवाडा, हैदराबाद परिसरातील संशोधकांनी घेतला असावा, असे वाटते.

हैदराबादेत मराठी अध्यापन आणि संशोधनाची मुहूर्तमेढ रोवणाऱ्या कै. प्रा. चिं. नी. जोशी यांच्या कार्याचे, संशोधनाचे उत्तम दर्शन घडविणाऱ्या ग्रंथांचे संपादन प्रा. द. पं. जोशी यांनी करून एक मोलाचे कार्य केले आहे. म. सा. परिषदेच्या संस्थापकांच्या लेखांचा संग्रह प्रकाशित करून आंध्रप्रदेश मराठी साहित्य परिषद त्यांच्या ऋणाची उतराई झाली आहे. पांढरा शुभ्र कागद व मोहरेदार मुद्रण यांमुळे ग्रंथ देखणा व वाचनीय झाला आहे. मुद्रणस्थळापासून संपादकांच्या दूरस्थ वास्तव्यामुळे मुद्रणशोधनाकडे लक्ष देणे त्यांना शक्य झाले नसावे. तथापि निदर्शनास आलेले काही महत्त्वाचे मुद्रणदोष येथे नमूद करतो. उदा. प्रा. द. पं. जोशी यांच्या लेखातील काही मजकूर अक्षरजुळणी करताना राहून गेलेला दिसतो. त्यामुळे त्या त्या ठिकाणची वाक्यरचना अर्धपूर्ण व अर्थहीन वाटते. (पृ. १४, २४.२५.) पृ. १३२-३३ वरील पुढील शब्दांचे चुकीचे मुद्रण झाले आहे. ते सुधारावयास हवे होते. उदा. शिन्नार्थी (भिन्नार्थी), मद्वा (माहा), सावून (कावून) इ. पृ. १८७ वरील एका वाक्यात मुद्राराक्षसाचे विनोदी दर्शन घडते. अशा ग्रंथांसाठी सूचीची गरज असते, ती द्यावयास हवी होती. असो.

अशा तऱ्हेच्या ग्रंथांतील लेखविषयांचे मूल्यमापन तत्कालीन वाङ्मयीन पार्श्वभूमीवर केले र त्यांचे महत्त्व लक्षात येते. प्रा. चिं. नी. जोशी यांचे विस्मृतीत जाणारे पायाभूत कार्य आणि यांचे स्फुट लेख ग्रंथरूपात साक्षेपपूर्वक संग्रहित व संपादित करून आजच्या वाचकांसमोर आणले, याबद्दल प्रा. द. पं. जोशी यांना धन्यवाद द्यावयास हवेत. या उपक्रमाबद्दल आंध्र प्रदेश मराठी साहित्य परिषद आणि प्रा. जोशी यांचे अभिनंदन!

■

डॉ. वसंत स. जोशी
१२४, 'सन्मित्र', पथ क्र. ९, महात्मा गृहरचना संस्था, कोथरुड, पुणे ४११ ०२९.

## स्वागत

- ❑ **ज्योतिष्याकडे जाण्यापूर्वी प्रश्नोत्तरातून सुसंवाद :** प्रकाश घाटपांडे, संज्ञा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४८.
- ❑ **अक्षर लेणी :** डॉ. शरयू शहा, डॉ. शरयू शहा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ४०.
- ❑ **कल्लोळ :** डॉ. शरयू शहा, डॉ. शरयू शहा प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ७२.
- ❑ **वाग्यात्री :** रत्नाकर यादव, चंद्रवदन प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५८.
- ❑ **मुहाजीर :** जावेद कुरेशी पाशा, युगसंवाद प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ८०.
- ❑ **आनंदवाडी :** का. ए. जोशी, तेजस प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ७२.
- ❑ **गुराखी :** का. ए. जोशी, तेजस प्रकाशन, औरंगावाद, पृष्ठे ५६.
- ❑ **फ — फजितीचा :** सौ. सरिता वैद्य, रजत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ११८.



अनुक्रमणिका

❖

# पंचधारा-सूची : चार दशकांची दमदार वाटचाल

❖

*(पंचधारा : समग्र-लेखन-सूची : १९५८-१९९८; संकलन - सौ. मीना मनसबदार-टिळक; प्रकाशक : आंध्र प्रदेश साहित्य परिषद, हैदराबाद; एप्रिल २०००; पृ. ८ + १०४; मूल्य पन्नास रुपये.)*

'पंचधारा' हे हैदराबाद येथील आंध्र प्रदेश मराठी साहित्य परिषद या संस्थेचे मुखपत्र आहे. भारतीय साहित्यविचाराला पोषक आणि परिपूरक असा ललित आणि वैचारिक मजकूर पुरविणारे वाङ्मयीन नियतकालिक म्हणून 'पंचधारा'ची ओळख मराठी वाङ्मयाच्या जगतात स्थिर झालेली आहे. म्हणूनच गेली ४० वर्षे चालू असलेल्या या नियतकालिकातील लेखनाची सूची संकलित होऊन ग्रंथरूपाने प्रकाशित होणे नितांत गरजेचे होते. आंध्र प्रदेश मराठी साहित्य परिषदेने नुकतीच 'पंचधारा'च्या पहिल्या चार दशकांची वाटचाल समाविष्ट असणारी म्हणजेच १९५८ ते १९९८ या चाळीस वर्षांतील लेखनांची सूची एप्रिल २००० मध्ये ग्रंथरूपात प्रसिद्ध केली आहे.

कोणत्याही सूचि-संकलनाकरिता परिश्रमाबरोबरच प्रज्ञेचीही गरज असतेच असते. विशेषत: नियतकालिकाच्या सूचि-संकलकाने स्वप्रज्ञेचा वापर करण्याची आवश्यकता असते. कारण सूचि-संकलन म्हणजे केवळ परिगणन व वर्गीकरण नसते; परिगणन-वर्गीकरणानंतरची एक महत्त्वाची पायरी सूचि-संकलकाने गाठायची असते आणि ती पायरी म्हणजे व्यवस्थापन. या व्यवस्थापनाकरिताच सूचि-संकलनास प्रज्ञेचा वापर करावा लागतो. आपण परिश्रमपूर्व तयार केलेल्या संदर्भ-नोंदी कशा पद्धतीने व्यवस्थापित करावयाच्या याचा काहीएक विचार सूचिकाराला करावा लागतो. यासाठी अर्थातच आपण कोणत्या नियतकालिकाचे सूचिकरण करीत आहोत आणि मुख्य म्हणजे कोणत्या उद्देशाने करीत आहोत, याचा किमान विचार सूचिकारास करावा लागतो.

'पंचधारा'सारखे वाङ्मयीन नियतकालिक जेव्हा सूचिकारासमोर येते तेव्हा त्याला वाङ्मय क्षेत्रातील प्रवर्ग किंवा उपप्रकार ध्यानात घेऊनच आपल्याकडील संदर्भनोंदींचे प्रवर्ग कल्पावे लागतात. अन्यथा वाङ्मयाच्या अभ्यासकांना त्याची सूची उपयोगाची ठरणारी नसते.

वाङ्मयीन नियतकालिकातील सूचीचे वर्गीकरण करताना त्या त्या नियतकालिकाचे ध्येयधोरण व स्वरूपही लक्षात घ्यावे लागते. 'पंचधारा'चेच उदाहरण येथे समर्पक ठरेल. 'पंचधारा'ने सुरुवातीपासून तेलुगु, कन्नड, तमिळ आणि हिंदी या भाषांमधील ललितकृतींचे (आणि वैचारिक लेखांचेही) अनुवाद देण्याचे धोरण ठेवलेले आहे. साहजिकच सूचिकाराला ही गोष्ट लक्षात घेऊन अनुवादित वाङ्मय असा उपप्रकार आपल्या वर्गीकरणाच्या आराखड्यात कल्पावा लागणार (आणि प्रस्तुत सूचीमध्ये तसा तो कल्पिलेला आहेही.)

ह्या सर्व गोष्टी नमूद करण्याचे कारण हेच आहे की अगोदर म्हटल्याप्रमाणे वाङ्मयीन नियतकालिकाची सूची तयार करण्याचे काम हे केवळ मेहनतीचे किंवा केवळ तांत्रिक स्वरूपाचे नसते. तेथे सूचिकाराची विचारशक्ती अनेकदा खरोखरच पणाला लागते.

आनंदाची गोष्ट म्हणजे 'पंचधारा' या नियतकालिकाची सूची सिद्ध करताना सूचिकार सौ. मीना मनसबदार-टिळक यांनी काही एक आराखडा अतिशय विचारपूर्वक निश्चित केलेला दिसतो. मुख्य म्हणजे ज्यांच्यासाठी आपण ही सूची तयार करीत आहोत त्या मराठीच्या अभ्यासकांच्या 'पंचधारा' संदर्भातल्या अपेक्षा त्यांनी येथे विचारात घेतलेल्या दिसतात. उदाहरणार्थ, 'पंचधारा' हे हैदराबादहून प्रसिद्ध होणारे नियतकालिक असल्यामुळे काही अभ्यासक हैदराबादविषयक लेखांची अपेक्षा 'पंचधारा'कडून करणारच, ही गोष्ट लक्षात घेऊन सूचिकार सौ. मनसबदार-टिळक यांनी "लेख" या विभागात अगदी सुरुवातीलाच "ऐतिहासिक/हैदराबादविषयक लेख" हा प्रवर्ग दिलेला आहे. सूची हेच मुळात अभ्यासकाची सुखसोय पाहणारे साधन असल्याने दक्ष सूचिकार अशा सुखसोयींच्या जागा बरोबर हेरतो.

प्रस्तुत सूचीचे (१) चर्चासत्र, (२) पुस्तक परीक्षणे, (३) ललित वाङ्मय. (४) लेख, (५) लोक-वाङ्मय, (६) संकीर्ण (लेख) विभाग, (७) संपादकीय व संपादकीय टिपणे आणि (८) परिशिष्टे असे वेगवेगळे विभाग केलेले आहेत. या प्रत्येक विभागाचे पुन्हा त्या त्या विभागाच्या स्वरूपानुसार व गरजेनुसार उपविभाग पाडलेले आहेत. आपली सूची अभ्यासकांना जास्तीत जास्त सुलभतेने कशी वापरता येईल याची काळजी सूचिकार सौ. मनसबदार-टिळक यांनी पुरेशा प्रमाणात घेतली आहे. उदाहरणार्थ; 'पंचधारा'ची सूची ही प्रामुख्याने साहित्याचे विद्यार्थी व अभ्यासक वापरणार हे ध्यानात घेऊन सूचिकर्तीने येथे साहित्याचे जास्तीत जास्त विभाग व उपविभाग कल्पिलेले आहेत. "लेख" या प्रकाराच्या अंतर्गत "समीक्षात्मक लेख" आणि "साहित्यशास्त्रीय लेख" असे वेगवेगळे उपप्रकार तर केलेले आहेतच पण साहित्याच्या अभ्यासात पुन्हा अर्वाचीन साहित्य आणि प्राचीन (म्हणजे मध्ययुगीन) साहित्य असे गट पडतात हे ध्यानात घेऊन सूचिकर्तीने "प्राचीन साहित्य व साहित्यकारांविषयी लेख" असा स्वतंत्र उपप्रकार कल्पिलेला आहे. यातही पुन्हा (अ) प्राचीन साहित्य संहिता, (आ) प्राचीन मराठी साहित्य व साहित्यकार, (इ) शिलालेख चर्चा आणि (ई) संस्कृत/प्राकृत, असे चार गट केलेले आहेत. "पुस्तक परीक्षण" हा वेगळा विभाग ठेवलेला असून या विभागतही कथा, कविता, कादंबरी, नाटक इत्यादी वाङ्मयप्रकारनुसार १२ उपविभागांमधून संदर्भनोंदी दिलेल्या आहेत.

परिशिष्ट हा आठवा विभाग तर अभ्यासकांची जास्तीत जास्त सुखसोय व्हावी याच दृष्टीने खास तयार केलेला आहे. त्यात 'पंचधारा'च्या उपलब्ध अंकांची सूची दिलेली आहे. एखाद्या नियतकालिकाचे सूचिकरण जितके महत्त्वाचे असते, तितकेच त्याच्या उपलब्धीचे तपशील देणेही महत्त्वाचे असते. कारण यामुळे अभ्यासकाचा वेळ व परिश्रम यांची बचत होते. याच परिशिष्टात 'पंचधारा'च्या विशेषकांची सूची दिलेली आहे. मराठीच्या अभ्यासकांना हे माहितीच आहे की, 'पंचधारा'चा विशेषांक संदर्भ-ग्रंथाचाच आवाक असणारा असतो. (आपल्या

काही विशेषांकांची स्वतंत्र पुस्तके स्वत: आंध्रप्रदेश मराठी साहित्य परिषदेने छापलेली आहेत.)

कोणत्याही चांगल्या सूचीची अखेर ही व्यक्तिनामसूची आणि ग्रंथनामसूचीने होत असते. येथेही सौ. मनसवदार-टिळकांनी या दोन्ही सूची तयार करून जोडलेल्या आहेतच; पण त्याचबरोबर ''अनुवादित वाङ्मयाची भाषावार सूची'' देऊन आपल्या सूचिकार्याला त्यांनी जास्तीत जास्त परिपूर्णता आणलेली आहे.

या सूचीला ''पंचधारा: चार दशकांची वाटचाल'' या नावाचे एक प्रास्तविक आहे. त्यात मुख्यत: 'पंचधारा'चे ध्येय व स्वरूप यासंबंधाने ऊहापोह आहे. या प्रास्तविकाखाली प्रास्तविक लिहिणाऱ्याचे नाव नाही. परंतु हे प्रास्तविक 'पंचधारा'चे विद्यमान संपादक डॉ. पद्माकर दादेगावकर यांनीच लिहिलेले असावे असे त्यातील मुद्दे व मजकूर पाहता वाटत राहते. हे प्रास्तविक वाचत असताना 'वाङ्मयीन नियतकालिक' या संकल्पनेच्या संदर्भात आपण समृद्ध होत राहतो, हे अधोरेखित करून सांगावेसे वाटते. सूचिग्रंथास असे मौलिक प्रास्तविक जोडले गेल्याने या सूचिग्रंथाची संदर्भसंपन्नता वाढलेली आहे.

या सूचीतील प्रकार, उपप्रकार व प्रवर्ग नोंदी यांचे साधे अवलोकनही आपणास विचारमग्न करीत जाते. उदाहरणार्थ ''कलाविषयक लेख'' या उपप्रकाराखालच्या नोंदी पाहताना आपल्या मनात असे येत जाते की आपण साहित्याचा जो सुटा, केवळ साहित्यक्षेत्रीय असाच विचार करतो. तो अपुरा आहे. संगीत, नृत्य, नाट्य, शिल्प इत्यादी कलांचा विचार जर आपण करू लागलो तर तेथील कलातत्त्वीय विचारामुळे आपला साहित्यतत्त्वीय विचार परिपूर्ण होण्यास मदत होईल. ('पंचधारा' या नियतकालिकाचे 'पंचधारा' हे नाव संगीत, नृत्य, नाट्य, शिल्प आणि साहित्य या पंचकलांचा ऊहापोह करणारे नियतकालिक म्हणूनही सार्थ व अन्वर्थक ठरते, असे ही सूची पाहून म्हणावेसे वाटते.)

'पंचधारा'च्या या सूचीत त्रुटी किंवा दोष नाहीत असे नव्हे. पण त्याकडे मुद्दाम लक्ष वेधून या स्तुत्य व अभिनंदनीय उपक्रमास गालबोट लावावे असे वाटत नाही. मुख्य म्हणजे ही सूची अभ्यासकांच्या अपेक्षा आणि गरजा यांची परिपूर्ती करणारी आहे, हे सांगणेच जास्त महत्त्वाचे वाटते.

नियतकालिकाच्या सूचीमुळे अभ्यासकाची सोय होते, हे तर आहेच, पण अशी सूची हेच त्या नियतकालिकाचे एक वस्तुनिष्ठ व स्पष्ट मूल्यमापनाचे अव्वल साधन होते. या विशिष्ट नियतकालिकात कोणकोणत्या विषयावर लेख आले (आणि कोणकोणत्या विषयावर आले नाहीत), कोणकोणते अभ्यासक यात लिहित राहिले, या नियतकालिकात कोणते वाङ्मयीन वाद झडत राहिले, वाचकांच्या पत्रव्यवहारातून कोणकोणत्या प्रश्नांना महत्त्व दिले गेले इत्यादी अनेक गोष्टी केवळ सूची पाहून कळतात आणि मग त्यांद्वारे त्या नियतकालिकाचा आपण एक दर्जाही निश्चित करू शकतो. 'पंचधारा'च्या प्रस्तुत सूचीवरून 'पंचधारा' बाबत काही कयास सहजपणे बांधता येतात. आनंदाची गोष्ट म्हणजे या सूचीवरून 'पंचधारा' हे मराठीच्या क्षेत्रातील वाङ्मयाभ्यासाचे एक अव्वल व अस्सल साधन आहे असे निश्चयाने म्हणता येते. कारण एका बाजूला मध्ययुगीन साहित्याबाबतचे संशोधनपर व चिकित्सक लेखन छापता छापताच 'पंचधारा'

साहित्यविश्वातील समकालीन व अद्ययावत प्रश्नांची चर्चा असणारे लेखनही (उदाहरणार्थ, आधुनिकतावाद व उत्तरआधुनिकतावाद या संबंधाने भरपूर मते नि मतांतरे असलेले लेखन) पुरेशा संख्येने देते. 'पंचधारा'ने काढलेले विशेषांक सूचीत वेगळे नोंदविलेले आहेत याचा उल्लेख अगोदर आलाच आहे. भारतीय साहित्य (सं) कल्पना विशेषांक (१९८७) हा जसा साहित्याचे भारतीयत्व समजून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा वाटतो, तसेच आंध्र प्रदेशातील रंगभूमी विशेषांक (एप्रिल-जून १९७८) आणि कन्नड रंगभूमी समजून घेण्याचे साधन म्हणून महत्त्वाचेच अंक वाटतात. व्यक्तिवेध घेणारे किंवा व्यक्तीच्या साहित्याचा व कर्तृत्वाचा परामर्श घेणारे मुन्शी प्रेमचंद, कुरुंदकर, टी. पी. कैलासम, वा. वि. मिराशी, र. म. भुसारी यांच्यावरचे अंक अभ्यासकांना आकर्षित करणारे असणारच.

'पंचधारा' आपल्या नावाला जागून तेलुगु, कन्नड, तमिळ, हिंदी व मराठी या पाच भाषेतील साहित्य व साहित्यविचार यांचीच धारा सतत प्रवाहित ठेवणारे नियतकालिक आहे, हे या सूचीवरून कळत राहते. त्यामुळे एकूण साहित्य, साहित्यविचार व साहित्यव्यवस्था याकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोन केवळ मराठीपुरताच संकुचित न राहता, तो भारतीयतेच्या दिशेने विस्तारित होत जातो. ही पंचधारा-सूचीची मोठीच देणगी मानायला हवी.

म्हणूनच अशी चांगली सूची मराठीच्या अभ्यासकांच्या हाती दिल्याबद्दल सूचिकार सौ. मीना मनसबदार-टिळक या खास अभिनंदनास पात्र ठरतात. डॉ. पद्माकर दादेगावकर आणि डॉ. उमा दादेगावकर यांचाही या सूचिकार्यास हातभार लागलेला आहे. ते दोघे आणि ही सूची आवर्जून प्रसिद्ध करणारे परिषद कार्यवाह प्रो. द. पं. जोशी हेही अभिनंदनास पात्र ठरतात. मराठीचे अभ्यासक या सर्वांचे निश्चितच ऋणी राहतील.

■

प्रा. इंद्रजित कुलकर्णी
द्वारा : श्री. भगवंत कुलकर्णी
मु. पो. राजुरी, ता. करमाळा, जि. सोलापूर

---

## स्वागत

- **पांढऱ्या जगातील अंधार :** राजन खान, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे २२०.
- **एक विद्यार्थ्याचे पत्र :** अनुवाद : चंदुलाल सावन, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ९६.
- **पाटचं पाणी :** माधव कदम, परिमल प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ५६.
- **संभाजी राजे :** सदाशिव शिवदे, निवेदिता प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५५६.
- **अर्धी मुंबई :** संपादक — सुहास कुलकर्णी, मॅजिस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २३८.
- **सर्व काही :** डॉ. दिलीप पंडित, संवेदना प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६८.
- **ताराशंकर बंदोपाध्याय :** महाश्वेतादेवी, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे ७०.
- **स्मृतीची चाळताना पाने :** मूळ लेखक : पोपट हिरचंदानी, अनुवाद : छनहर्दवान, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे ९०.

---

❖

# अहिराणीतली श्रीमंत कविता - आदिम तालनं संगीत

❖

*(आदिम तालनं संगीत* : डॉ. सुधीर देवरे,
*भाषा प्रकाशन,* वडोदा.पृष्ठे ११२, किंमत रु. ८०/-)

ग्रीक तत्त्वज्ञानी म्हणायचे, "जगाचे, विश्वाचे मुख्य तत्व म्हणजे ताल. आकाशातील तारे जणू गाणे म्हणत असतात. त्यांचे ते थरथरणे म्हणजे भावनोत्कट गाण्यातील कंप होय. विश्वात मेळ नसता तर ते चालले नसते." म्हणजेच तेथे संगीत आहे. रवींद्रनाथ म्हणायचे, "प्रभो, तू गानसिंधू आहेस. तुझ्या विश्वात्मक संगीतात मला माझीही तान मिसळू दे." स्वत:च्या जीवनात, समाजाच्या जीवनात आपणास संगीत आणायचे आहे. परंतु सारेजण मिळते घेतील, परस्परांस प्रेमाने सांभाळतील तरच ते शक्य, अशी ही संगीताची महती आहे. या संगीताच्या मुळाशी आणि तळाशी काही कवी जाऊन पोहोचतात. सृष्टीच्या निर्मितीपासून निर्माण झालेल्या या संगीताचा ते आजही आस्वाद घेतात. हा आस्वाद निसर्गात, पावसात, नदीनाल्यांत, झाडांच्या पानात, गवताच्या पात्यात आणि शेतांमधील पिकात असा सर्वत्र घेता येतो. ही सृष्टी पाहण्यासाठी डोळे उघडे असावे लागतात. कान उघडे व ग्रहणशील असावे लागतात आणि मन संवेदनशील असावे लागते. अशा संवेदनशील मनाचा कवी सृष्टीचं हे 'आदिम तालाचं संगीत' अवतीभवतीच्या निसर्गसृष्टीत आणि मानवसृष्टीत पहात असतो. त्यातून त्याला जे उत्कटपणाने भावतं. त्याला तो कवितेचं रूप देतो. त्याची ती कविता तुम्हा-आम्हांला वेगळं सृष्टीदर्शन घडवते.

कवी डॉ. सुधीर देवरे यांचा अहिराणी कवितांचा 'आदिम तालनं संगीत' हा कवितासंग्रह वाचला आणि त्यांच्या कवितेतून अनेक सूर मला गवसले. यां कवितासंग्रहात त्यांच्या १५३ कविता आहेत. या सर्व कविता अहिराणी बोली भाषेत आहेत. अहिराणी भाषा जे बोलतात, ऐकतात त्यांना ह्या कविता सहजपणाने कळतात. त्यातील भावदर्शन, विचारदर्शन, सौंदर्यदर्शन वाचकाला आगळावेगळा आनंद देतात. या आनंदाचं तोलनं व्यक्तिपरत्वे, रसिकपरत्वे वेगळं राहील. 'डंख व्यालेलं अवकाश' या प्रमाण मराठी भाषेतील कवितासंग्रहानंतरचा श्री. देवरे यांचा हा दुसरा कवितासंग्रह आहे. मुळातच कवीमन असलेल्या या कवीच्या अहिराणी कविता अतिशय आशयसंपन्न आहेत. या कवितांमध्ये 'आदिम तालनं संगीत' या शीर्षकाची कविता आहे. सृष्टीचा जन्म झाल्यावर हजारो वर्ष पाऊस पडला तेव्हा कुठे ही तप्त पृथ्वी थंड झाली. तेव्हापासून पाऊस कमी-अधिक प्रमाणात आजवर पडत राहिला. पाऊस जेव्हा येतो, तेव्हा त्याचं कधी रौद्र, कर्णकर्कश संगीत असतं. तो कौलावर टपटप पडायला लागला तर तेव्हाचं लयबद्ध संगीत वेगळं असतं. पन्हाळातून, ओहळातून पाऊसपाणी वाहू लागलं तर त्या वाहण्याचं संगीत वेगळंच असतं. धबधब्याचं, नळातल्या पाण्याचं संगीत आपल्या वेगळ्या वैशिष्ट्यांनी मनोहारी असतं. कवीला हे पावसाचं आदिम संगीत मनापासून आवडतं. कृत्रिम

संगीत निर्माण करणारी साधने त्याला नकोशी वाटतात. त्यासाठी तो घराची कवाडं उघडी करून ठेवतो. कवी म्हणतो —

*पाऊसना आवाज सुरू जया*
*का मी बंद करी देस*
*टीवी रेडू आणि*
*घरातला सगळा*
*बारका बारका आवाज*
*आणि आयकत बसस*
*आदिम तालनं संगीत* (आदिम तालनं संगीत)

या आदिम तालाचं आकर्षण असल्यामुळेच कवीने पावसाची अनेक रूपे पाहिलेली आहेत. हा अनेक रूपातला पाऊस त्यांनी शब्दरूप केला आहे. एकूण १५३ कवितांमध्ये 'पाऊस' हा विषय-आशय असलेल्या खूप कविता आहेत. मात्र प्रत्येक पावसाचे वागणे वेगळे आणि कवीचा आविष्कारही वेगळा आहे. काही कविता अल्पाक्षरी असून त्यांमध्ये असलेल्या काव्यसौंदर्यामुळे त्या रमणीय झाल्या आहेत. काही वेळा कवीच्या कडू गोड वैचारिक ऊर्मी पावसाच्या थेंबांतून निथळताना दिसतात. 'झाडं बी वारा गिळीसन', 'आभाळवर उपकार', 'ढगवर ढगस्नी', 'आता कोणती गोळी घेऊ' 'नागडा पाऊसनी फूस', 'वारा सोडी देस म्हणा', 'पाऊस ईच आसे नाही', 'पाहिजे तवळ', 'सावल्यां, 'पाऊस पडी गया कां', 'ढगसले पाय बी कुठे न्हातस', ह्या कविता पाहिल्या की कवी किती पाऊस वेडा आहे ध्यानात येतं.

*आबूट सूर्यनं दर्शन*
*व्हऊ देत नही*
*आनि पडूबी देत नही*
*पानी*
*आबूट फक्त*
*सूर्य आणि आपलामा*
*आडतेगिरी करस*
*नागडा पाऊसनी*
*फूस लावस*
*रोज* (नागडा पाऊसनी फूस)

कवी पावसाच्या माध्यमातून जीवनदर्शनं घडविण्याचा प्रयत्न करताना दिसतो. जीवनदर्शन त्यात लपलेलं असतं. आगीत उष्णता किंवा लाकडात आग असावी असं जीवनदर्शन कवितांमध्ये लपलेलं दिसतं. डोळे वारीक करून पाहिलं तर त्या जीवनाच्या रंगच्छटा आपणास जाणवतात.

*कालदीस परोंदीस*
*उगेल गाजर गवतबी*

*हिरवंगार*
*जशा काही*
*आभाळवरच उपकार* (आभाळवर उपकार)

निसर्गाच्या आडोशाने अनेक निसर्गकवींनी आपल्या सांसारिक जीवनाचं दर्शन घडवलं आहे. त्यांनी सामाजिक व्यथांना मांडलं आहे. कवी देवरेंची कविताही असंच जीवनदर्शन व समाजदर्शन घडवते.

कवी सुधीरे देवरे यांना 'माणूस' या घटकाबद्दल विशेष ओढ व आस्था आहे. त्यांची कविता माणसांभोवती फेर धरताना दिसते. माणूस केंद्रस्थानी ठेवून ते आपल्या व्यथा बोलक्या करतात. म्हणूनंच त्यांची कविता ही माणसांची आणि माणसांसाठी आहे, असंच म्हणावं लागतं.

'माणसे कुणी पाळत नाही', 'किती सावली लागस', 'ढगसले पाय बी कुठे ऱ्हातस', 'मी मनी कविताले उवदार ढग म्हणस' इत्यादी कविता माणसासंबंधी असल्या तरी त्यांची संस्कृती, प्रकृती, विकृती कवी सहजपणाने आपणास दाखवून जातात. माणसाचा शोध ही अवघड गोष्ट आहे. पण डॉ. देवरे यांनी अवघड गोष्ट कवितेत आणून वसविली आहे.

*यकला दुकला*
*मानोसले*
*अशी किती सावली लागस*
*यवढा यवढा*
*जगमा —* (किती सावली लागस)

माणसाचं मूल्य सांगणारी कविता जीवनाच्या सत्याचं दर्शन घडवते.

*आता कुत्र पाळानी*
*संस्कृती शे*
*मानोस कोणी पाळत नही*
*कोणीच*
*कोणावर*
*भाळत नही.* (मानोस कोनी पाळत नाही)

या कवितेतील मानव्य हरवून बसलेली आपली संस्कृती माणसाकडून पशूकडे निघाली आहे. हे माणसाचं वागणं कवीस संस्कृतीचं लक्षण वाटत नाही. म्हणूनच तो माणसावर अशी तिरकस तिरंदाजी करताना दिसतो. कवीला माणूस मोलाचा आणि महत्त्वाचा वाटतो. मानवी संस्कृतीच्या सात्विक मूल्यांवर त्यांची निष्ठा आहे. ही निष्ठा त्यांच्या अनेक कवितांमधून व्यक्त झालेली आहे.

कवी सुधीर देवरे प्रेमकविताही प्रभावीपणाने लिहितात. त्यांचा प्रेमाचा अनुभव जळजळीत आणि दाहक आहे. त्यांच्या प्रेमकवितांत प्रेममीलन व्हायच्याऐवजी प्रेमाच्या रस्त्यावर 'ठोस' होत राहते. उदा.



अनुक्रमणिका








*डोळास्ले दूरथीनच*
*चाहूल लागी जास*
*कुठे यककडून*
*कुठे दोन्हीकडून*
*तरी डोळा लायी*
*भर पेठात*
*येखादी ठोस व्हयीच जास.*

कवी देवरेंची प्रेमकविता फारशी सफल प्रेमाची नाही. तर संघर्ष प्रेमाची आहे. 'पान्हा' कविता शृंगाररसपूर्ण आहे. पण त्यातही भोग आणि वात्सल्य यांचा संघर्ष पहावयास मिळतो. शेवटी पुरुषप्रधान संस्कृतीत भोग हा वात्सल्याचा चोळामोळा करून टाकतो, हे विदारक सत्य ते मांडतात.

*कुशीत साजन, रडे पाळनामा तान्हा*
*कशी बाई आवरू आते मन्हा ठसठसे पान्हा* (पान्हा)

कवी देवरे यांची कविता सुरू झाली की ती शेवटच्या ओळीपर्यंत गतिशील होऊन वाहत येते. ती कुठे थांबत नाही. तिची पूर्णता शेवटच्या ओळीतच होते. किंबहुना शेवटी शेवटी ती काव्यमय आशय आणि अर्थधारण करते. म्हणून कवी देवरे यांच्या कवितांचा शेवट अतिशय भावपूर्ण व अर्थपूर्ण वाटतो.

*पहिला दिवस पळक*
*दुसरा दिवस खत*
*तिसरा दिवस द्वेश*
*यानं नाव प्रेम* (यानं नाव प्रेम)

असाही त्यांचा प्रेमानुभव आहे. असा अनुभव सार्वत्रिक असतो असं नाही. पण असा अनुभव असू शकतो. याची जाणीव वाचकाला सहजपणे होऊन जाते.

*तिन्हा पावसाळा*
*जागा कराले गऊ*
*आनि मीच*
*उन्हाळा*
*व्हई वन.*

हा प्रेमानुभव म्हणजे काळजाला जाळणारा दाहक चटका आहे. प्रेमाचा अनुभव सांगताना प्रामाणिकपणा फार महत्त्वाचा असतो. मंगेश पाडगावकर म्हणतात,

*गाण्यात सर्व माझे माझे इमान आहे.*
*ज्याचे खरे न गाणे तो बेईमान आहे.*

कवी देवरे यांची कविता बेइमानी नाही. तिने सत्य आणि इमान सोडलं नाही. यातच डॉ. देवरे यांच्या कवितेचं यश सामावलेलं आहे.



अनुक्रमणिका

कवी देवरे यांच्या काही कवितांमधून त्यांचे व्यक्तिगत दु:खही ठिबकताना दिसते. व्यक्तिगत व्यथा सहज सरकत पुढे याव्यात लहान वालकासारख्या, तशा त्या कवितेत येऊन वसतात. पण त्यामुळे कवितांची आशयघनता वाढलेली आपणास दिसून येते. 'नैसर्गिक सत्य, मान्य करत नाही', 'तरुणपण पायरी लागीच नयी', 'उपरा गावमा गुपचुप', 'आपल काम नाही', 'काटा खुपशी जारू', 'समोरा जाई ऱ्हास' यांसारख्या कविता वाचल्या की कवी सुधीर देवरे यांचे दु:खविश्व आपणास कळते. असं असलं तरी या दु:खाचा हळवेपणा कवीमध्ये नाही. 'ना खेद ना खंत' या न्यायानुसार कवी आपला कर्मयोग सुरू ठेवतो.

कवी सुधीर देवरे यांच्या काही कवितांमधून उघडा नागडा शृंगार येतो आणि काही कवितांमधून श्लेषात्मक अश्लिलताही डोके वर काढताना दिसते. ''आपू आंड ठेशेल हिजडाच शेत आता'' यांसारख्या ओळी (कविता-बैलयारी) काव्यात्मकतेला आणि काव्यसौंदर्याला मारक ठरतात. काही कवितांचे अर्थ वाचकांना श्लेषात्मक वाटतील इतक्या त्या स्पष्ट आहेत. कविता स्पष्ट असून अस्पष्ट असणे हे चांगले लक्षण मानले जाते. 'तोच नळा तोच खिळा', 'खुप गरज शे', 'चेहरा झाकी टाक्' 'आल्हाद सोडी देस', 'मोरी सोडी दिधी' यांसारख्या कविता संग्रहाचे सुरेल आणि लयदार संगीत हे पॉप संगीत करून टाकतात. म्हणून अशा कवितांमुळे आदिम ताल हा आधुनिक झाल्यासारखा वाटतो. कदाचित वाचकाला जो अर्थ प्रतीत होतो त्यापेक्षा कवीच्या मनात वेगळं काही असू शकेल. पण कविता छापून झाली की ती पब्लिक प्रॉपर्टी होते. मग पब्लिकला पाहिजे तो अर्थ घेण्याची परवानगी मिळते.

द्राक्षांच्या गोड घडात एखादं द्राक्ष आंबट निघाले म्हणून घडाची किंमत कमी होत नाही. तसा कवी डॉ. सुधीर देवरे यांचा हा अहिराणी कवितांचा गोड रसाचा आशय आणि अर्थपूर्ण कवितासंग्रह आहे. 'सुईनने तोडलेली नाळ' कवीला सापडत नसली तरी वाचकांना ती नाळ कवितांमध्ये सापडली आहे आणि तिचे नाते कवीच्या प्रामाणिक अनुभव विश्वाशी असल्यामुळे त्या अनुभवाचे आविष्करण उत्तम झाले आहे. म्हणून डॉ. सुधीर देवरे यांचा कवितासंग्रह रसिकांना आनंद देणारा झाला आहे.

■

प्रा. शं. क. कापडणीस, सटाणा (जि. नाशिक).

---

**अंक २९७, पृष्ठ ८६, चुकीची दुरुस्ती व दिलगिरी**

घोड्यापुढं गीता : विश्वनाथ खैरे, संमत प्रकाशन, औंध, पुणे, पृष्ठे १८.
साहित्य मिथ्य माहित्य : विश्वनाथ खैरे, संमत प्रकाशन, औंध, पुणे, पृष्ठे ६८.
विश्वनाथ खैरे ऐवजी विश्वनाथ खैरनार झाले होते, तसेच श्रीमती गुंडी निलीमा, पुणे, यांनी संस्थेस पाचशे रुपयांची देणगी दिली आहे. पण अंक क्र. २९७ मध्ये चुकून रु. २००/- दाखवले गेले आहेत.

तसेच गेल्या अंकात दिवाळी अंक पारितोषिकाचे वृत्त देताना परीक्षकांची नावे राहून गेली होती. त्याबद्दल दिलगिरी व्यक्त करीत आहोत. या स्पर्धेसाठी डॉ. कल्याण इनामदार, डॉ. सुप्रिया अत्रे, डॉ. मंजिरी नेऊरगावकर यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले होते आणि त्यांच्या वतीने समारंभात डॉ. कल्याण इनामदार यांनी भाषण केले. वरील सर्व चुकांबद्दल दिलगिरी व्यक्त करीत आहोत.

---



अनुक्रमणिका

❖

# विज्ञान संस्कार करणारी चार आकर्षक पुस्तके

❖

'पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन संस्थे'ने विज्ञान साक्षरता ग्रंथमालेत विख्यात लेखक आणि खगोल अभ्यासक श्री. सुधाकर भालेराव यांची अत्यंत वेधक अशी चार पुस्तके अलिकडेच प्रकाशित केली आहेत. ही पुस्तके खूपच रंजक आहेत, त्याचबरोबर मुलांना आणि प्रौढांना मार्गदर्शक आणि उपयुक्त ठरतील अशी आहेत.

**१. लोकभ्रम आणि विज्ञानसाक्षरता** (पृष्ठे १०१, मूल्य ३० रुपये)

या पुस्तकात पन्नासच्यावर लोकभ्रमांतील वैज्ञानिक पार्श्वभूमी स्पष्ट करून लोकभ्रमांवर प्रकाश टाकला आहे. लोकभ्रम कसे निर्माण झाले? त्याची कारणे प्रारंभी स्पष्ट करून तारा तुटणे, धूमकेतू, ग्रहणे, रोगांच्या साथी, भूकंप, फलज्योतिष, प्राणी, भूतबाधा, रत्ने, खडे, बुवाबाजी, रेकी, डावखुरी माणसे अशा विविध विषयांशी निगडित लोकभ्रमांचे स्वरूप स्पष्ट करण्यात आले आहे. आकर्षक अशा चित्रांचाही या पुस्तकात समावेश केलेला आहे. भाषा सुबोध आणि आकर्षक आहे.

**२. विज्ञान शतपत्रे** (मुलांचे विज्ञान संस्कार) (शंभरावर पृष्ठे, मूल्य २० रुपये) :

मुलांवर आणि पालकांवर विज्ञान संस्कार व्हावेत, अशा हेतूने श्री. सुधाकर भालेराव यांनी लिहिलेले हे पुस्तक आहे. पुस्तक पत्ररूपात आहे. पुस्तकात एकूण एकशे एक पत्रांचा समावेश आहे. घरात आणि घराबाहेर मुलांचे सतत निरीक्षण सुरू असते. त्यांच्या मनात प्रश्न निर्माण होत असतात. काजवा का प्रकाशतो? सरडा रंग का बदलतो? झोप कधी कधी का लागत नाही? फुलांना सुगंध का येतो? अशा अनेक प्रश्नांची उत्तरे या पुस्तकात मिळतात. मुलांमध्ये वैज्ञानिक दृष्टिकोन रुजावा यासाठी लेखकाचा हा फार चांगला असा प्रयत्न आहे.

**३. असे शोध अशा कथा** (मूल्य २५ रुपये) :

आतापर्यंत जे वैज्ञानिक शोध लागले त्यातील प्रमुख शोधांचा परिचय अत्यंत आकर्षक अशा भाषेत कथेच्या स्वरूपात या पुस्तकात श्री. सुधाकर भालेराव यांनी वाचकांना करून दिला आहे. हाडाच्या सांगाड्याची गोष्ट, छातीची ठकठक यापासून दूरदर्शनपर्यंत पंचावन्न अशा विविध शोधांच्या गोष्टी या पुस्तकात कथन केल्या आहेत. विज्ञानाचा सम्यक इतिहासच या गोष्टींमधून समोर उभा राहतो. वैद्यकीय शोध कसे लागले? रोगांवर उपचार कसे अस्तित्वात आले? अशा अनेक गोष्टी वाचकाला या पुस्तकातून कळतात.

**४. ध्वनीच्या विश्वात** (पृ. ६०, मूल्य २० रुपये) :

श्री. भालेराव यांचे ध्वनीची कहाणी कथन करणारे हे पुस्तक वाचकाला खूप आवडेल. ध्वनी म्हणजे काय? ध्वनीची ओळख, श्राव्यातील ध्वनी, दूरध्वनी, रेडिओ, वाद्ये आणि ध्वनी, स्वर कसे संवादी? अशा विविध प्रकरणांतून अर्थपूर्ण चित्रे आणि आकृत्या याद्वारे

लेखकाने वाचकाला करून दिली आहे.

कुमार वयातील मुलामुलींवर होणाऱ्या संस्कारांचा नेहमीच गांभीर्याने विचार करावा लागतो. कारण या वयातील योग्य संस्कारांची शिदोरी त्यांना जन्मभर साथ करीत असते. कल्पनेच्या विश्वात रमविणारे चांगले कथात्म साहित्य मुलांवावत रंजनासाठी हवे असतेच, पण तेवढ्याने भागत नाही. मुलामुलींतील वैचारिक भुकेला चालना देऊन ती वाढविणे हे त्याहून महत्त्वाचे असते.

आजच्या संगणकीय युगात तर त्याची नितांत आवश्यकता आहे. मुलामुलींना विज्ञान विश्वाचा परिचय झाला पाहिजे, त्यांना त्या विश्वाची ओढ लागली पाहिजे हे कुणीही नाकबूल करणार नाही. अपेक्षा इतकीच की हे सर्व पंतोजीच्या सुरात, प्रौढांच्या पातळीवरून होता उपयोगाचे नाही. ते मुलांचे मानसशास्त्र ध्यानात घेऊन त्यांच्या पातळीवरून व्हायला पाहिजे. श्री. सुधाकर भालेराव यांना मानले पाहिजे ते यासाठीच!

या चारही पुस्तकांत त्यांनी अतिशय सहजतेने, सोपेपणी, शिकविण्याचा आव न आणता, रंजकपणे विज्ञानविषयक ज्ञानाचा खजिना रिता केलेला आहे. प्रौढ वाचकही रमेल असे हे लेखन आहे. या पुस्तकांचे उपयुक्तता-मूल्य म्हणूनच मोठे आहे. यासाठी लेखक श्री. भालेराव आणि प्रकाशक 'पुणे विद्यार्थी गृह' हे दोघेही अभिनंदनास पात्र आहेत.

■

गौतम देशपांडे
विजयालक्ष्मी सोसायटी, पुणे ४११ ०३८.

---

## स्वागत

- **सण साजरे गुढीपाडवा ते होळी :** द. ना. जोशी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर, पृष्ठे ११४.
- **पहाटेची नाती :** नीलांबरी कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर, पृष्ठे १४०.
- **घडण :** प्राचार्य अरविंद सातळेकर, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर, पृष्ठे १६०.
- **आता तुझ्याच साठी :** द. रा. दंडगे, प्रेरणा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९६.
- **धवलगान :** संपादक डॉ. सुभाषचंद्र अक्कोळे, अनेकांत शोधपीठ, बाहुबली, पृष्ठे १६०.
- **आजही स्त्रीचे स्थान दुय्यमच :** डॉ. प्रतिमा इंगोले, दिलीपराज प्रकाशन, पुणे.
- **रबरी फुगे :** प्रतिमा इंगोले, सोनल प्रकाशन, अमरावती, पृष्ठे २४.
- **सोन्याचं वाळं :** प्रतिमा इंगोले, सोनल प्रकाशन, अमरावती, पृष्ठे ४८.
- **कान्होबांची भंबेरी :** वासंती इनामदार-जोशी, रुक्मिणी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ४८.
- **सुखाचा मंत्र :** वासंती इनामदार-जोशी, रुक्मिणी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ३२.
- **आचरणाचे तेज :** वासंती इनामदार-जोशी, रुक्मिणी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ४८.
- **पडसाद :** विनय जोशी, श्रीगणेश प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४२.
- **लोककथा :** संभाजी खरात, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ४८.
- **दरिद्री नारायण :** व. न. इंगळे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ३६०.
- **बहात्तर खोड्या :** लक्ष्मीकांत रांजणे, नीलकंठ प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५६.



अनुक्रमणिका

❖

# अखिल भारतीय साहित्य महामंडळाचे प्रसिद्धी-पत्रक

❖

**मराठीवर अन्याय करणारा शासनाचा निर्णय**

महाराष्ट्र शासनाच्या शिक्षणखात्याने ५ जुलै रोजी आकस्मिकपणे एक परिपत्रक काढून या शैक्षणिक वर्षापासून 'माहिती व तंत्रज्ञान' हा नवीन विषय अभ्यासक्रमात समाविष्ट करण्यात येत असून ११ वीच्या विद्यार्थ्यांना मराठी इ. भाषांच्याऐवजी हा विषय घेता येईल, असे जाहीर केले. ज्या कनिष्ठ महाविद्यालयांना (किंवा उच्च माध्यमिक विद्यालयांना) हा विषय सुरू करण्याची इच्छा आहे, त्यांनी १० जुलैच्या आत शासनाच्या शिक्षण विभागाकडे अर्ज करावा, असेही या परिपत्रकात म्हटले आहे. असे हे ५ जुलैचे पत्रक सर्व संस्थांकडे पोचले आणि अडीचशेच्या वर शिक्षणसंस्थांनी दिलेल्या मुदतीत शासनाकडे अर्जही केले! इतक्या द्रुतगतीने दुसरा कुठला शासकीय निर्णय आजवर अंमलात आला आहे काय, याचा शोधच घ्यावा लागेल.

महाराष्ट्रात स्वभाषेची जेवढी उपेक्षा केली जाते, तेवढी या भारतात कुठल्याही राज्यात करण्याची तेथील शासनाची हिंमत होणार नाही. कन्नड, तमिळ, हिंदी, बंगाली भाषा बोलणारी राज्ये स्वभाषेच्या हितरक्षणाबाबत किती जागरूक असतात, ते शिक्षणमंत्र्यांसह सर्व संबंधितांनी तेथे जाऊन अवश्य पाहावे. १९६४ मध्ये तेव्हाच्या प्री डिग्रीला विज्ञान विभागात मराठी विषय आवश्यक होता, त्या ऐवजी ऐच्छिक करण्यात आला. तेव्हा विज्ञान विभागातून मराठीची संख्या एकदम घटली. १९७९ मध्ये वाणिज्य विभागातून मराठीचे उच्चाटन करण्याचा निर्णय झाला होता; त्यावेळी कुसुमाग्रजांपासून सर्वांनी विरोध दर्शविल्यामुळे मराठीचे स्थान टिकले. पण तेथेही मराठीला इतर भाषांचा पर्याय देण्यात आलाच. शहरांमध्ये फ्रेंच, जर्मन, संस्कृत, हिंदी अशा भाषांच्या अध्यापनाची सोय असल्यामुळे तेवढ्या प्रमाणात विद्यार्थी मराठीपासून दुरावले. १९८४-८५ पासून विज्ञान शाखेकडे इलेक्ट्रॉनिक्स हा नवा विषय आणला आणि त्या पाठोपाठ संगणकशास्त्र हाही विषय आला. 'व्यावसायिक अभ्यासक्रम' या नावाने २०० गुणांची प्रश्नपत्रिका सुरू करताना पुन्हा भाषाविषयांवर गदा आली, तेव्हा विज्ञान शाखेकडील भाषांचे उरलेसुरले विद्यार्थीही मराठीच्या अभ्यासाला मुकले.

उच्च शिक्षणाच्या प्रारंभीच मराठीला असे कमी लेखण्याचे धोरण राबविल्यावर पदवी शिक्षणात मराठी (व अन्य भाषा) घेणारे कुणी उरणार नाहीत. या शासनाचे महाराष्ट्रातून मराठीचे उच्चाटन हे ध्येय असावे असे दिसते. असा मूलगामी व कायमचा परिणाम करणारा निर्णय घेण्यापूर्वी सर्व संबंधितांशी आणि त्या क्षेत्रातील विचारवंतांशी चर्चा करण्याचा सुसंस्कृत मार्गही आता शासनाच्या सध्याच्या धोरणात बसत नाही, असे दिसते. 'मराठीची

खुशाल उपेक्षा करा; काही लोक आरडाओरडा करतील, अशांना तोंडदेखली आश्वासने द्या आणि कालहरणाचे तंत्र स्वीकारा' अशी ही शासनाची निर्ढावलेली कार्यपद्धती बनून गेली आहे.

महाराष्ट्रात मराठीला सन्मानाचे, न्याय्य व हक्काचे स्थान मिळालेच पाहिजे यासाठी तर १९६० साली महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली आहे. मराठीच्या जागरूक अभिमान्यांनी महाराष्ट्र शासनाच्या असल्या स्वभाषा-विरोधी निर्णयाविरुद्ध आवाज उठविला पाहिजे. 'माहिती-तंत्रज्ञान' यासारख्या नवीन विषयांचे कुणीही स्वागत करील. पण असे विषय जादा विषय म्हणूनच आणले पाहिजेत. अभ्यासक्रमात असलेल्या भाषाविषयांच्या मुळावर हे नवे विषय येता कामा नयेत. हेच तत्त्व इलेक्ट्रॉनिक्स, संगणक इ. विषयांच्या बाबतीत लावले पाहिजे.

माहिती तंत्रज्ञान हा विषय भाषाविषयांच्या ऐवजी ११ वी पासून सुरू करण्याचा हा निर्णय शासनाने त्वरित रद्द करावा व ५ जुलैचे परिपत्रक तावडतोब मागे घ्यावे अशी अ. भा. मराठी साहित्य महामंडळाची महाराष्ट्र शासनाकडे मागणी आहे.

**डॉ. गं. ना. जोगळेकर**
अध्यक्ष, अ. भा. मराठी साहित्य महामंडळ



---

## *आभार*

*सुप्रसिद्ध बांधकाम व्यावसायिक श्री. डी. एस्. कुलकर्णी यांनी परिषदेला रु. १०००/- (रु. एक हजार) ची विशेष देणगी दिली आहे. तसेच परिषदेच्या अंकांसाठी ४ जाहिराती दिल्या आहेत. त्याबद्दल त्यांना धन्यवाद !*

*यासाठी प्रमुख कार्यवाह ह. ल. निपुणगे यांनी विशेष प्रयत्न केले.*



अनुक्रमणिका

### *दिवाळी अंक स्पर्धा २००१*

*म.सा.परिषदेतर्फे प्रतिवर्षी दिवाळी अंक स्पर्धा घेतली जाते व सर्वोत्कृष्ट चार अंकांना प्रत्येकी रु. १०००/- ची पारितोषिके दिली जातात. याखेरीज कथा, ललितलेख यांच्यासाठीही पारितोषिके दिली जातात. परिषदेकडे स्पर्धेसाठी आलेल्या अंकांमधूनच ही निवड करण्यात येते. तरी सर्व संबंधितांनी दिवाळी अंक प्रकाशित होताच त्याच्यां दोन प्रती परिषदेकडे पाठवाव्यात. अंक पाठविण्याची शेवटची तारीख ३० नोव्हेंबर २००१ आहे. पारितोषिक वितरण जानेवारी महिन्याच्या अखेरीस करण्यात येते.*

*रंगा मराठे, निमंत्रक, दिवाळी अंक स्पर्धा २००१*

### स्वागत

- **राजवाडे लेखसंग्रह :** संपादक — लक्ष्मणशास्त्री जोशी, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे ३०६.
- **स्वातंत्र्य लढ्यातील कवने :** संपादक — राजा मंगळवेढेकर, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे १०६.
- **ॲनिमल फार्म :** मूळ लेखक — जॉर्ज ऑरवेल, अनुवाद — श्रीकांत लागू, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे ७२.
- **बाबराची स्मृतिचित्रे :** अनुवाद : डॉ. ह. य. दिवेकर, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे १७८.
- **बाल साहित्य :** रवींद्रनाथ ठाकुर, अनुवाद : सरोजनी कमलनाथ, संपादित : लीला मुझुमदार, क्षितीय राय, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे २०६.
- **बालकवी :** दमयंती पांढरीपांडे, साहित्य अकादमी, मुंबई, पृष्ठे ७२.
- **From Paris with Poems :** प्रो. जवाहर मुथा, हेमंत पब्लिकेशन, अहमदनगर, पृष्ठे ५१.
- **अपरिग्रहांचा महामेरू :** श्री. दि. इनामदार, शुभम् प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ५६.
- **श्वेतकमळ :** प्रा. कृष्णा चौधरी, पूर्वा प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ८०.
- **निर्झर :** द. ना. प्रभू (माड्याची वाडी), बाळासाहेब लाटकर प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ३०.
- **इंदिरा यांचे काव्य विश्व :** म. सु. पाटील, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे २०६.
- **मुक्काम शांती निकेतन :** पु. ल. देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १६४.
- **एक शून्य मी :** पु. ल. देशपांडे, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १९२.
- **वा. द. क. :** मंगेश पाडगावकर, मौज प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १३०.
- **चोळी बांगडी :** पी. के. जाधव, श्री समर्थ साई वितरण, पुणे, पृष्ठे १३२.
- **दि ब्रिगेडियर :** एस्. एम्. भालेराव, राजदीप प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६०.
- **आजचे प्रबोधन :** वामन निंबाळकर, प्रबोधन प्रकाशन, नागपूर, पृष्ठे १६८.
- **कुबेर :** मधू पोतदार, मंजुल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २४८.
- **सयाजीनगरातील साहित्य विचार :** प्रकाशक - स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.
  भाग १ : संपादक गणेश अग्निहोत्री व दत्तात्रय पुंडे, पृष्ठे ४४४.
  भाग २ : संपादक गणेश अग्निहोत्री व दत्तात्रय पुंडे, पृष्ठे ४७८.

# कार्यवृत्त

(१ एप्रिल २००१ ते ३० जून २००१)

**संकलन : ह. ल. निपुणगे**



## वर्षभरातील स्मृतिदिन व व्याख्याने

**पुणे शाखा : दि. १० एप्रिल २००१**
**ज्ञानकोशकार डॉ. श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन : समाधीस पुष्पांजली व व्याख्यान**

या दिवशी सकाळी ठीक ८ वा. परिषदेचे नवनिर्वाचित कार्यकारी मंडळाचे सभासद सर्वश्री डॉ. गं. ना. जोगळेकर, ह. ल. निपुणगे, रत्नाकर कुलकर्णी, प्रमोद आडकर, दीपक करंदीकर, डॉ. अरविंद लेले, पत्रिका संपादक डॉ. अ. वा. कुलकर्णी आणि केतकरप्रेमी ज्येष्ठ नागरिक सर्वश्री डॉ. हे. वि. इनामदार, डॉ. वा. के. लेले, ताम्हणे, न्यायमूर्ती बी. के. देशमुख व अन्य नागरिक यांच्या उपस्थितीत कमला नेहरू उद्यानातील समाधीस्थळी फुले वाहून केतकरांच्या स्मृतीला अभिवादन करण्यात आले.

प्रारंभी नवनिर्वाचित स्थानिक कार्यवाह व कवी दीपक करंदीकर यांनी केतकरांच्या स्मृतीला अभिवादन करण्यासाठी स्वरचित काव्य सादर केले. प्रमुख कार्यवाह श्री. ह. ल. निपुणगे यांनी प्रास्ताविक केले व कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रस्तुत समाधीस्थळाच्या सध्या झालेल्या दुरावस्थेबद्दल उपस्थितांसमोर आवाहन केले. पत्रिकेच्या गेल्या तिमाही अंकात कार्याध्यक्षांच्या ह्या आवाहनाला प्रतिसाद मिळून जागच्या जागी समाधीच्या जीर्णोद्धारासाठी जमा झालेल्या निधीचे तपशीलवार वृत्त जाहीर केले आहेच.

सायंकाळी परिषदेच्या सभागृहात डॉ. वा. के. लेले यांचे 'प्राचीन भारतीय वाङ्मयीन संस्कृती' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. अरविंद लेले यांनी प्रास्तविक, परिचय व आभार मानले. दीपक करंदीकरांनी सूत्रसंचालन केले.

**दि. २९ एप्रिल २००१ : प्रा. श्री. के. क्षीरसागर : २१ वा स्मृतिदिन : व्याख्यान**

म. सा. परिषद व क्षीरसागर स्मृतिसमिती यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे 'समीक्षक श्रीकेक्षी' या विषयावर भाषण झाले. स्मृतिसमितीचे एक कार्यवाह डॉ. चंद्रशेखर बर्वे यांनी प्रास्तविक व परिचय करून दिला. तसेच श्रीकेक्षींचे पुतणे श्री. शरदराव क्षीरसागर यांनी श्रीकेक्षींच्या काही हृद्य आठवणी सांगितल्या. समितीचे दुसरे कार्यवाह श्री. शंकर सारडा यांनी आभार मानले. सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी केले.

**दि. ५ मे २००१ :**

**बालकवि-स्मृतिदिन :**

बालकवि-स्मतिदिनानिमित्त डॉ. अश्विनी धोंगडे यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन आयोजित करण्यात आले. या कविसंमेलनात रमण रणदिवे, डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, मनोहर सोनवणे, जयंत भिडे, डॉ. संगीता बर्वे, मीरा शिंदे, संजीवनी बोकील, अरविंद भुजबळ,

अंजली महागावकर, श्रीकांत तापीकर, घन:श्याम धेंडे, अंजली कुलकर्णी, दीपक करंदीकर आदि कवि-कवयित्रींनी रंग भरला. तसेच प्रसिद्ध गायिका व संगीतकार सौ. कीर्ती मराठे यांनी बालकवींच्या दोन निवडक काव्यरचना सादर केल्या.

**दि. ११, १२ व १३ जून २००१ : सानेगुरुजींच्या ५१ वा स्मृतिदिन, पु. ल. देशपांडे यांचा पहिला स्मृतिदिन व आचार्य अत्रे यांचा ३२ वा स्मृतिदिन :**

यंदाच्या वर्षी प्रथमच मराठी सारस्वताच्या प्रांगणातील सानेगुरुजी, पु. ल. देशपांडे व आचार्य अत्रे या तीन दिग्गज साहित्यिकांचे स्मृतिदिन लागोपाठ तीन दिवस म. सा. परिषद व रंगतसंगत प्रतिष्ठान, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने साजरे केले गेले. ह्या तिन्ही दिवसांचे वैशिष्ट्य म्हणजे साहित्य रसिकांच्या उपस्थितीचा मिळालेला प्रचंड प्रतिसाद होय.

दि. ११ जून रोजी साने गुरुजींच्या ५१ व्या स्मृतिदिनी डॉ. रामचंद्र देखणे यांचे 'संस्कार कथा' या विषयाला अनुसरून कथाकथन झाले.

दि. १२ जून रोजी पु. ल. देशपांडे यांच्या प्रथम स्मृतिदिनी 'चिरस्मरणीय पुल' हा पुलंनी स्वरबद्ध केलेल्या गाण्यांचा, नाट्यप्रवेशांचा व पेटीवादनाचा बहारदार कार्यक्रम झाला. या कार्यक्रमाची संकल्पना व निवेदन सौ. विनीता आपटे व अजित देशपांडे यांनी केले. श्रीकांत कुलकर्णी, धनश्री गणात्रा, सुनिल दामले आदी कलाकारांनी त्यांना साथसंगत दिली.

दि. १३ जून रोजी आचार्य अत्रे यांचा ३२ वा स्मृतिदिन सौ. उज्ज्वला कुलकर्णी यांच्या विनोदी कथाकथनाने साजरा झाला.

या तिन्ही कार्यक्रमांचे सूत्रधार रंगतसंगत प्रतिष्ठानचे अध्यक्ष श्री. प्रमोद आडकर व परिषदेचे कार्यवाह दीपक करंदीकर हे दोघे होते. तसेच प्रास्ताविक व स्वागत कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले. वक्त्यांचा व कलाकारांचा परिचय दीपक करंदीकर व प्रमोद आडकर यांनी करून दिला.

**दि. २१ जून २००१ :**

**कै. नाथमाधव स्मृतिदिन व्याख्यान :**

कै. नाथमाधव स्मृतिदिन यंदा लोकप्रिय लेखक श्री. सुहास शिरवळकर यांची प्रकट मुलाखत आयोजित करून श्रोत्यांच्या लक्षणीय उपस्थितीत साजरा करण्यात आला. दीपक करंदीकर व श्री. मंगेश वाघमारे या दोघांनी शिरवळकरांची मुलाखत घेतली. परिषदेच्या कार्यवाह श्रीमती नंदा सुर्वे यांनी आभार मानले.

**दि. २३ जून २००१ : कै. का. र. मित्र स्मृतिदिन व्याख्यान**

का. र. मित्र स्मृतिदिनानिमित्त डॉ. न. म. जोशी यांचे 'पत्रकारिता' : कालची आणि आजची' या विषयावर व्याख्यान झाले.

तसेच परिषदेला अतिशय उपयोगी ठरणारी आवश्यक अशी भिंतीवरील चार घड्याळांची देणगी देणाऱ्या श्रीमती पुष्पलता रानडे यांचा या प्रसंगी सत्कार करण्यात आला. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**श्री. दीपक करंदीकर,** स्थानिक कार्यवाह, पुणे.

❑

## पिंपरी-चिंचवड शाखा

महाराष्ट्र साहित्य परिषद, पिंपरी-चिंचवड शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा दि. २३ जून २००१ रोजी सायंकाळी ६ वा. घारे शास्त्री सभागृह, चिंचवड येथे आयोजित करण्यात

आली होती. सभेच्या अध्यक्षस्थानी म.सा.प. जिल्हा कार्यवाह कवी अरविंद भुजबळ हे होते. सभेच्या सुरुवातीस ज्येष्ठ साहित्यिक शंकरराव खरात यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. शाखेच्या सन २०००-२००१ चे ताळेबंदास सर्वानुमते मान्यता दण्यात आली व नंतर सन २००१-२००२ साठी पदाधिकारी निवड करण्यात आली. पिंपरी-चिंचवड शाखेच्या अध्यक्षपदी सौ. ललीत पावळकर, कार्याध्यक्षपदी गुलाव विरदवडे, कार्यवाह सौ. रूपाली अवचरे, किरण लाखे यांची निवड सर्वानुमते करण्यात आली. तसेच उपाध्यक्षपदी सुनिल यादव यांची निवड करण्यात आली. कोषाध्यक्ष सुहास घुमरे.

म. सा. परिषद शाखेच्या वतीने पिंपरी-चिंचवड परिसरातील साहित्यिकांची सूची तयार करण्यात यावी, यावावत अनेक सभासदांनी सूचना केल्या. या सभेत प्रा. गुलाबराव देशमुख (माजी अध्यक्ष) डॉ. मुरलीधर जावडेकर आदी मान्यवर सदस्यांनी विचार व्यक्त केले.

**गुलाब बिरदवडे,** शाखा कार्याध्यक्ष



## ठाणे शाखा

### गेल्या तीन महिन्यातील शाखेद्वारे आयोजित केलेले कार्यक्रम

'संसदीय लोकशाही वृत्तपत्रांचे स्थान : भूमिका व कर्तव्य' या विषयावर विधानसभा अध्यक्ष मा. अरुणभाई गुजराथी यांचे व्याख्यान आयोजित केले होते. यावेळी बोलताना ते म्हणाले, 'आज लोकशाहीवरचा विश्वास उडत चालला आहे. बुद्धिवादी मतदानाला निघत नाहीत. हा काही अंशी लोकशाहीचा जोपर्यंत वृत्तपत्र स्वातंत्र्य नाही, तोपर्यंत त्या देशात खऱ्या अर्थाने लोकशाहीचा पराभव आहे. नाही. संपादकीयाच्या माध्यमातून वर्तमानपत्राची किंमत कळते. पत्रकारितेला, पत्रकाराला चारित्र्य असावे'. हे व्याख्यान नयना आचार्य यांनी त्यांच्या 'साहित्यिक वडिलांच्या — वि. वा. जोशी - स्मृतिप्रीत्यर्थ दिलेल्या देणगीतून आयोजित केले होते.

**२ व ३ जून २००१**

५ वे ठाणे जिल्हा मराठी साहित्य संमेलनाच्या आयोजनासाठी, ठाणे शाखेने म. सा. प.च्या अंवरनाथ शाखेला भरघोस आर्थिक सहाय्य देऊन संमेलन यशस्वी करण्यास सहकार्य केले.

**पद्माकर शिरवाडकर,** शाखा कार्यवाह



## इस्लामपूर शाखा

### दि. ३१ मार्च २००१

### डॉ. विवेक देशपांडे स्मृतिदिन साजरा

या कार्यक्रमासाठी श्री. विश्वास मेहेंदळे यांची 'मला भेटलेली माणसे' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते. सदर कार्यक्रमामध्ये प्रा. शामराव पाटील यांची राजारामवापू सहकारी बँकेच्या अध्यक्षपदी निवड झाल्यावद्दल सत्कार करण्यात आला. त्याचवरोबर डॉ. दीपा देशपांडे यांचाही सदर कार्यक्रमात सत्कार करण्यात आला. त्यांची राजारामबापू बँकेच्या संचालक मंडळावर निवड व म. सा. पुणे येथे सांगली जिल्हा प्रतिनिधी म्हणून निवड झाल्याने हा सत्कार आयोजित केला होता. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्राचार्य शरद भोसले यांनी केले. प्रा. दशरथ पाटील यांनी आभार मानले.

### मधू कुलकर्णी स्मृतिदिन

प्राचार्य मधु कुलकर्णी स्मृतिदिनानिमित्त दि.

२३ मे २००१ रोजी प्रा. विजय कारेकर, पुणे यांचे 'भक्तीमार्ग' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक प्रा. शामराव पाटील यांनी केले. प्रमुख पाहुण्यांची ओळख डॉ. दीपा देशपांडे यांनी करून दिली व आभार प्रा. दशरथ पाटील यांनी मानले.

**म. सा. प. वर्धापन दिन**

इस्लामपूर शाखेचा वर्धापनदिन दि. २ जून २००१ रोजी साजरा झाला. त्यानिमित्त गोवा राज्याचे माजी शिक्षणमंत्री प्रा. गोपाळराव मयेकर यांचे 'पसायदानाची अपूर्वाई' या विषयावर व्याख्यान झाले. याप्रसंगी म. सा. प.चे सदस्य शाहीर यशवंत पवार यांच्या 'चमके शिवबाची तलवार' या पोवाड्याचे कॅसेट प्रकाशनही श्री. मयेकर यांच्या हस्ते झाले. प्रमुख पाहुण्यांची ओळख प्रा. शामराव पाटील यांनी केली, तर आभार प्राचार्य शरद भोसले यांनी मानले.

**प्रा. दशरथ पाटील,** शाखा कार्यवाह



## सोलापूर शाखा

दि. ११ एप्रिल रोजी झालेल्या साहित्य परिषद, सोलापूर शाखेतील कार्यकारिणीच्या पहिल्या बैठकीत सर्वश्री बाबुराव मेंदर्गीकर आणि केंद्र-नियुक्त सदस्य म्हणून प्रा. डॉ. शे. दे. पसारकर यांची स्वीकृत सदस्य म्हणून निवड करण्यात आली.

दि. २६ एप्रिल रोजी कार्यकारिणी सदस्य प्रा. चंद्रभूषण कुलश्रेष्ठ यांचे हृदयविकाराने अकाली निधन झाले. त्यांना दि. ३० एप्रिल रोजी शाखेच्या वतीने श्रद्धांजली वाहण्यात आली. तसेच ज्येष्ठ साहित्यिका श्रीमती मालतीबाई बेडेकर, सोलापुरातील कवी श्रीनिवास सूर्यवंशी व गुलबर्गा येथील मराठी साहित्य मंडळाचे संस्थापक सदस्य व अभ्यासू समीक्षक लेखक कवी डॉ. चंद्रशेखर कपाले यांच्या निधनाबद्दलही दि. १० मे रोजी परिषदेतर्फे श्रद्धांजली वाहण्यात आली.

दि. ६ मे रोजी कै. माधव गोविंद काटकर यांच्या 'भैरवी' कविता संग्रहाचे प्रकाशन आय. एम. ए. हॉल येथे प्रा. निशिकांत ठकार यांच्या अध्यक्षतेखाली व शाखेचे अध्यक्ष दत्ता हलसगीकर यांच्या हस्ते व डॉ. निर्मलकुमार फडकुले यांच्या प्रमुख उपस्थितीत झाले. या कार्यक्रमाचे संयोजन कार्याध्यक्ष लक्ष्मीनारायण बोल्ली व काटकर कुटुंबियांनी केले होते.

दि. २७ मे २००१ रोजी म. सा. प. शाखा सोलापूर व कवी कै. कुमार कोठावळे स्मृति प्रतिष्ठानच्या वतीने सोलापुरातील गुणीजनांचा पुरस्कार देऊन सत्कार करण्यात आला. याप्रसंगी श्री. राजगुरु, आगरकर, हेमकिरण पत्की, सौ. शोभा बोल्ली, रजनीश जोशी आदींचा सत्कारात समावेश होता.

या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. गो. मा. पवार व प्रमुख अतिथी म्हणून पुणे सकाळचे प्रमुख संपादक अनंत दीक्षित होते. याप्रसंगी दत्ता हलसगीकर, लक्ष्मीनारायण बोल्ली, प्रा. सुहास पुजारी, पद्माकर कुलकर्णी, डॉ. महादेव देशमुख, सौ. विजया जहागिरदार, बाबुराव मैंदर्गीकर आदी पदाधिकारी, कार्यकारिणी सदस्य व साहित्यप्रेमी उपस्थित होते. शेवटी काव्य संमेलन आयोजित करण्यात आले होते.

कार्यकारिणी सदस्य कै. चंद्रभूषण कुलश्रेष्ठ यांचे निधन झाले असल्याने त्यांच्या झालेल्या कार्यकारिणीच्या रिक्त पदावर साहित्य परिषदेचे आजीव सदस्य रजनीश जोशी यांची एकमताने कार्यकारिणीच्या सभेत निवड करण्यात आली.

**श्री. पद्माकर कुलकर्णी,** शाखा कार्यवाह



अनुक्रमणिका

## पारितोषिके

**१९ एप्रिल २००१ : स. ह. मोडक स्मृतिदिन :**

अनुवादित पुस्तकास किंवा ज्येष्ठ अनुवादकास यावेळी रु. २००० चे स. ह. मोडक पारितोषिक देण्यात येते. ते यावर्षी मालवणच्या वनिता सावंत यांना त्यांच्या 'द्वंद्व' या अनुवादित कथासंग्रहाला देण्यात आले. हा कथासंग्रह मूळ राजस्थानी भाषेतला आहे. अध्यक्षस्थानी प्रा. के. रं. शिरवाडकर होते, तर परीक्षक म्हणून डॉ. शिरीष चिंधडे व भारती पांडे यांनी काम पाहिले. भारती पांडे यांनी निवडीमागची भूमिका मांडली.

## परिषदेचा ९५ वा वर्धापन समारंभ

**२६ मे २००१ :** विशेष ग्रंथकार पुरस्कार व विविध ग्रंथपारितोषिकांचे वितरण परिषदेच्या वर्धापनदिनानिमित्त प्रतिवर्षी आयोजित करण्यात येते. परिषदेचा हा लक्षवेधी समारंभ असतो. विशेष ग्रंथकार पुरस्कारप्राप्त लेखक आणि विविध वाङ्मयीन विषयांतर्गत विजेते यांचा गौरव करण्यासाठी हा सोहळा आयोजित केला जातो.

यावर्षी या समारंभासाठी शिवाजी विद्यापीठाचे भूतपूर्व कुलगुरू व समाजशास्त्रज्ञ डॉ. द. ना. धनागरे हे अध्यक्ष म्हणून लाभले. विविध पुरस्कार विजेते लेखक व त्यांना दाद देण्यासाठी आलेल्या रसिक प्रेक्षकांनी परिषदेचे माधवराव पटवर्धन सभागृह अक्षरश: ओसंडून भरले होते. त्यामुळे प्रतिवर्षाप्रमाणेच याही वर्षी जागेच्या कमतरतेबाबत खंत व्यक्त करण्यात आली. काही प्रेक्षकांना दाटीवाटीने उभेही राहावे लागले, पण त्यांच्या चेहेऱ्यावर नाराजीची रेषाही उमटलेली दिसत नाही. उलट प्रसन्नतेने आणि उत्साहाने त्यांची मुद्रा टवटवीत झालेली असते. आपल्या आवडत्य लेखकाला भरभरून प्रतिसाद देण्यासाठी ते सज्ज झालेले असतात. याच गर्दीमध्ये सन्माननीः परीक्षकांनाही स्वत:ला सामावून घ्यावे लागते. तीच गोष्ट सन्माननीय देणगीदारांची. त्यांनाही य गर्दीत स्वत:ला सांभाळून घ्यावे लागते. पण कोणीही तक्रारसूर न काढता या उत्साहपर्वात सामील होत असते याची विशेष नोंद करायला हवी.

कार्यक्रमाची सुरुवात झाली ती सावनी दातार हिने गायलेल्या 'ॐ नमो जी आद्या' या गणेशस्तवनाने. वातावरणातले आनंदरंग आणखी गडद झाले.

यानंतर या पारितोषिकांची पार्श्वभूमी, त्यामागची परंपरा याविषयी सविस्तर माहिती कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविकामध्ये दिली.

काही परीक्षकांनी ग्रंथनिवडीमागची भूमिका स्पष्ट केली. तसेच काही पारितोषिक विजेत्या लेखकांनीही मनोगते व्यक्त केली. देणगीदारांचा तसेच परीक्षकांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. डॉ. धनागरे यांचा परिचय प्रा. अरविंद कुलकर्णी यांनी करून दिला.

आपल्या अध्यक्षीय भाषणात डॉ. द. ना. धनागरे यांनी आपले विचार विशद केले. ते म्हणाले, "वाजतगाजत होणाऱ्या प्रकाशन समारंभामुळे पुस्तकांचे वस्तुनिष्ठ मूल्यमापन होण्यावर त्याचा परिणाम होतो, हे लक्षात घेऊन पुस्तकांचे प्रकाशन समारंभ बंद होणे आवश्यक आहे.

"पारितोषिकांसाठी पुस्तकांची वस्तुनिष्ठ निवड होण्यासाठी आणि साहित्य क्षेत्रातील राजकारण दूर ठेवण्यासाठी पुस्तकांची परीक्षण होण्याआधी चर्चा होऊ नये. भपकेबाजपणामुळे होणाऱ्या

प्रकाशन समारंभामुळे एखादे पुस्तक दर्जेदार असल्याचा आभास निर्माण होऊ शकतो. पंधरा-वीस जणांना बोलावून त्या पुस्तकावर चर्चा घडवणे, त्या पुस्तकावद्दल वातावरण निर्माण करणे, हे गैर आहे.''

पुढे त्यांनी असेही सूचित केले की, प्रकाशन समारंभ करून पुस्तक प्रकाशित करणारांचा विचार करावयाचा की नाही, हे साहित्य परिषदेसारख्या संस्थेने ठरवले पाहिजे. पारितोषिकामुळे सर्जनशीलतेला वाव मिळतो. मात्र पारितोषिक आणि निर्मिती यांचा संबंध असतोच, असे नाही. लेखकाचे झपाटलेपण महत्त्वाचे.'' शेवटी सावनी दातारने पसायदान गायिले आणि समारंभाचा समारोप झाला. या दिवशी प्रदान करण्यात आलेली पारितोषिके याप्रमाणे -

**२६ मे २००१ : विशेष ग्रंथकार पुरस्कार**

(पारितोषिकाचे नाव, रक्कम व विजेता लेखक या क्रमाने)

| | | | |
|---|---|---|---|
| १) | पं. रामाचार्य अवधानी, (तत्वज्ञानविषयक लेखन) | रु. १,५००/- | डॉ. ज. वा. जोशी, पुणे. |
| २) | डॉ. शं. दा. पेंडसे, (संतसाहित्यविषयक लेखन) | रु. १,०००/- | श्री. ना. वि. काकतकर, संपादक 'संतकृपा', पुणे. |
| ३) | कविवर्य भा. रा. तांबे, (काव्यपुरस्कार) | रु. १,१००/- | श्री. शंकर रामाणी, वेळगाव. |
| ४) | कविवर्य ना. घ. देशपांडे, (काव्यपुरस्कार) | रु. १,१००/- | कवी सुधांशु, औंदुबर. |
| ५) | मा. कृष्णराव फुलंब्रीकर, (संगीतविषयक लेखन) | रु.१,०००/- | श्री. अशोक श्री. रानडे, पुणे. |
| ६) | डॉ. भालचंद्र फडके, (दलित साहित्य-विवेचन) | रु. १,०००/- | डॉ. यशवंत मनोहर, नागपूर. |
| ७) | डॉ. वि. कृ. गोकाक, (महाराष्ट्र-कर्नाटक संबंधविषयक लेखन) | रु. १,०००/- | डॉ. विजया तेलंग, गुलबर्गा. |
| ८) | प्रा. गो. रा. परांजपे, (विज्ञानविषयक लेखन) | रु. १,०००/- | प्रा. प्र. वि. सोवनी, पुणे. |
| ९) | कै. कमलाकर सारंग, (नाट्य-पारितोषिक) | रु. ३,०००/- | श्रीमती सई परांजपे, मुंबई. |
| १०) | 'मृत्युंजय', (रामायण, महाभारत, वेद, पुराणे इ.) | रु. ४,०००/- | प्रा. श्री. र. भिडे, पुणे. |

**२६ मे २००१ : वार्षिक ग्रंथपारितोषिके**

(ग्रंथपारितोषिकाचे नाव, वाङ्मयप्रकार, रक्कम, विजेता लेखक, पुस्तकाचे नाव या क्रमाने)

| | | | |
|---|---|---|---|
| १) | ह. ना. आपटे (कादंवरी) | रु. १,०००/- | रंगा मराठे, 'फॅक्टरी गेट' |
| २) | वा. म. जोशी (कादंबरी) | रु. १,०००/- | डॉ. अरुण गद्रे, 'वधस्तंभ' |



अनुक्रमणिका

३) आनंदीबाई शिर्के (कथासंग्रह) रु. १,०००/- मिलिंद वोकील, 'ग्रेन गार्डन'

४) नी. स. गोखले (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) रु. १,०००/-
राजहंस प्रकाशन, ('डोमेल ते कारगिल)

५) जांभेकर पुरस्कार (संपादित ग्रंथ) रु. १००/-
संपादक : डॉ. अविनाश आवलगावकर, 'वि. स. खांडेकरांचे साहित्य : एक आकलन'

६) ह. श्री. शेणोलीकर (समीक्षा) रु. १,०००/-
केशव सद्रे, 'कवितेतील आधुनिक वाद'

७) रा. ना. नातू (इतिहासविषयक) रु. ७५०/-
मुकुंद जोशी, 'महाराजांच्या लढाया'

८) वासुदेव धोंडो आणि भागीरथीबाई दीक्षित (धार्मिक) रु. १,०००/-
प्रा. कृष्णा गुरव, 'श्री ज्ञानदेवी : विविधांगी संगोपन'

९) तुळशीराम वाघ (संतसाहित्य) रु. २५०/-
र. रा. गोसावी, 'श्री समर्थ रामदास विरचित स्तोत्रकाव्य'

१०) श्री. शा. हणमंते (कोश व संदर्भ-वाङ्मय) रु. ३५०/-
मीना मनसबदार-टिळक, 'पंचधारा-चार दशकांची वाटचाल'

११) सुशील प्रधान (बालवाङ्मय) रु. २००/- मीना वैद्य, 'खजिना बालगीतांचा'

१२) विनायक कोंडदेव ओक (कुमार वाङ्मय) रु. ३००/- डॉ. मंदा खांडगे, 'दोडी'

१३) डॉ. म. वि. गोखले (नाट्यसमीक्षा/नाट्यसंहिता) रु. १,०००/-
प्रा. एम्. पी. पाटील, 'नाट्यसमीक्षा-संहिता आणि रङ्गप्रयोग'

१४) सत्यशोधक केशवराव विचारे (ललितेतर वैचारिक) रु. १,०००/-
डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, 'जोतिपर्व'

१५) लोकहितवादी (ललितेतर वैचारिक) रु. १,०००/-
डॉ. शंकरराव कदम, 'महर्षी विठ्ठल रामजी शिंदे : साहित्य आणि कार्य'

१६) शि. म. परांजपे (ललितेतर वैचारिक) रु. १,०००/- राजीव साने, 'युगांतर'

१७) ना. गो. चाफेकर (ललितेतर वैचारिक) रु. २५०/-
बळवंत कांबळे, 'भारतातील देवदासी प्रथा : चळवळ आणि पुनर्वसन'

१८) विश्वनाथ गोखले (ललितेतर वैचारिक) रु. १५०/-
रंगनाथ पठारे, 'आस्थेचे प्रश्न'

१९) डॉ. ज. रा. कदम (कृषिविषयक लेखन) रु. १,०००/-
डॉ. शिवाजीराव ठोंबरे आणि डॉ. व. सी. खुस्मे 'जैव उर्जा शेती'

**२७ मे २००१ :** या समारंभाचे डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक व स्वागत केले. डॉ. अरविंद लेले यांनी सुमित्रा महाजन यांचा परिचय करून दिला. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी श्रीपाद जोशी यांचा परिचय करून दिला. भा. म. गोरे यांचा परिचय डॉ. अ. वा. कुळकर्णी यांनी करून दिला आणि प्रभाकर संत यांचा परिचय डॉ. भगवान ठाकूर यांनी करून

दिला. कार्यवाह प्रमोद आडकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. सावनी दातार यांनी शारदा स्तवन व पसायदान म्हटले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

परिषदेच्या या वर्धापनदिन समारंभाच्या निमित्ताने एका ज्येष्ठ लेखकाचा म. सा. प.चे पारितोषिक (रु. ५,०००/- व स्मृतिचिन्ह) देऊन सत्कार करण्यात येतो. तसेच साहित्य संस्थांमधील ज्येष्ठ कार्यकर्त्याचा कै. डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार (रु. १,०००/-) देऊन गौरव केला जातो. यावर्षी म. सा. प.चा हा ९५ वा वर्धापन दिन होता. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी श्री. राजेंद्र बनहट्टी होते. प्रमुख पाहुण्या म्हणून निमंत्रित केले होते, महिला व बालविकास खात्याच्या केंद्रीय राज्यमंत्री श्रीमती सुमित्रा महाजन यांना.

प्रदीर्घ आणि दर्जेदार वाङ्‌मयीन कार्याबद्दल दिले जाणारे 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक' आणि सन्मानचिन्ह महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध कोशकार व साहित्यिक श्री. श्रीपाद जोशी यांना प्रदान करण्यात आले. तसेच वयोवृद्ध लेखक, अनुवादक व लघुत्तम कथाकार प्रा. भा. म. गोरे यांचा विशेष सत्कार करण्यात आला. सार्वजनिक संस्थेत निरलसपणे कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यास देण्यात येणारा कै. डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार कल्याण येथील म. सा. परिषदेचे ज्येष्ठ कार्यकर्ते श्री प्रभाकर संत यांना प्रदान करण्यात आला.

सत्कारला उत्तर देताना श्री. श्रीपाद जोशी म्हणाले, 'वैचारिक साहित्यनिर्मिती हेच माझे मुख्य कार्य आहे. मी मराठी साहित्याचा परिचय साने गुरुजींच्या प्रेरणेने महाराष्ट्राबाहेर करून दिला. परंतु मराठी साहित्यिकांनी माझी दखल घेतली नाही.' श्रीमती सुमित्रा महाजन म्हणाल्या, 'युवा पिढीला साहित्याची गोडी लागावी म्हणून त्यांच्या पालकांनी प्रयत्न केले पाहिजेत. तरुणांना साहित्याशी जोडले पाहिजे. या कामात साहित्यसंस्थांनी पुढाकार घेणे आवश्यक आहे. तसेच जन्मभर उपयोगी पडतील असे भारतीय परंपरेतील संस्कार बालवयात मुलांवर होतील, याची पालकांनी काळजी घ्यायला हवी' असेही त्यांनी आवर्जून सांगितले.

अध्यक्षपदावरून बोलताना श्री. राजेंद्र बनहट्टी म्हणाले, 'संस्थेची परंपरा, उत्तम संच व नेतृत्व यामुळे संस्थेची प्रगती चालू आहे, मात्र साहित्यप्रसाराचे कार्य होऊ नये, असे शासनास वाटत असल्याची शंका येते. दहा वर्षांपूर्वी तत्कालीन मुख्यमंत्री शरद पवार यांनी परिषदेसाठी जाहीर केलेल्या एक लाख रुपयांच्या अनुदानात आजपर्यंत वाढ झालेल्या नाही. वर्षाला दहा लाख रु. अनुदान मिळण्याची गरज आहे. हा समारंभ स. प. महाविद्यालयाच्या विद्यार्थी सभागृहाच्या प्रशस्त दालनात साजरा झाला. समारंभाचे देखणे व्यासपीठ श्री. रत्नाकर कुलकर्णी व श्री. प्रमोद आडकर यांनी करवून घेतले होते. स. प. महाविद्यालयाचे प्राचार्य श्री. मोडक व उपप्राचार्य श्री. पु. श्री. घैसास यांचे परिषदेतर्फे आभार.

**२९ जून २००१ : कै. दि. बा. मोकाशी स्मृतिदिन :** कथा/कादंबरी/प्रवासवर्णन यांपैकी एका साहित्यप्रकारास आलटून पालटून रु. १,००० चे हे पारितोषिक जाहीर केले जाते. यावर्षी या पारितोषिकासाठी श्री. प. बा. सावंत यांच्या 'पोस्टमार्टेम' या कथासंग्रहाची निवड करण्यात आली. परीक्षक म्हणून डॉ. नीलिमा गुंडी व श्रीमती नंदा सुर्वे यांनी काम पाहिले.

**नंदा सुर्वे,** कार्यवाह

## म. सा. परिषदेच्या आजीव सभासदांची यादी

कादर शौकत शेख अब्दुल्ला, श्रीरामपूर
गोसावी रिमा रमेश, श्रीरामपूर
जोशी केतकी विजय, श्रीरामपूर
गायकवाड मनीषा, श्रीरामपूर
क्षत्रिय स्मिता उदय,' श्रीरामपूर
रोहमारे शोभा अशोक, श्रीरामपूर
रोहमारे अशोक कारभारी, श्रीरामपूर
तांदळे संतोष साहेबराव, श्रीरामपूर
फडके श्रीराम विष्णुपंत, श्रीरामपूर
आगलावे भरत दशरथ, श्रीरामपूर
गर्जे अजय चंद्रकांत, कोपरगाव
नवले समता नानासाहेब, कोपरगाव
जोशी विनायक अनंत, पुणे
वाडेकर मीरा श्रीकृष्ण, पुणे
माने अरुण रामचंद्र, रहिमतपूर
भोसले माणिकराव जगन्नाथ, एकसळ
वोघे अनिल अप्पासाहेब, दुधी
भोइटे विलास यशवंत, तडवळे
माने वैभव विजयराव, रहिमतपूर
जोशी वर्षा अरुण, पुणे
गोडबोले नितीन शंकर, पुणे
आडकर मैथिली प्रमोद, पुणे
घोरपडे संजीव शिवाजीराव, इस्लामपूर
काटकर शिवराज अप्पासहेब, सांगली
पाटील अनिल ना., जव्हार
मुकणे प्रशांत दयानंत, जव्हार
वनकर कल्पना सुरेश, श्रीरामपूर
फासाटे संगीता चद्रभान, कोरेगाव
पाटील के. वी., धुळे
जोशी चंद्रशेखर प्रभाकर, धुळे
सरदेसाई सिंधू शिवकुमार, धुळे
दामोदर अनिल महादु, धुळे
चौक प्रीतम विष्णू, धुळे
कदम कुमार भुजंगराव, धुळे
पाटील धनंजय केशवराव, धुळे
चित्ते पुंडलिक म., धुळे
सोहनी प्रदीप श्रीरंग, ठाणे
वाघोलीकर दिलीप दत्तात्रय, ठाणे
तंबाके एस्. व्ही., सोलापूर
अंदाले महेश मल्लीकार्जुन, सोलापूर
जोशी विजया श्रीराम, सोलापूर
खाडे रमेश मनोहर, सोलापूर
जोशी अरविंद दासराव, सोलापूर
गुरव देविदास श्रीमंत, सोलापूर
पोरे रविकिरण उमेश्वर, सोलापूर

देशपांडे विजया व्यं., मोहोळ
कुलकर्णी मनिषा जयवंतराव, मोहोळ
जोशी चंद्रकांत यज्ञेश्वर, ठाणे
अभ्यंकर सुहासिनी कृष्णाजी, अंबरनाथ
थत्ते माधुरी अंकुर, अंबरनाथ
गायकवाड पुष्पा एस्., अंबरनाथ
साठे अश्विनी अशोक, अंबरनाथ
खरे मकरंद मधुसुदन, अंबरनाथ
ठाकुरदेसाई रमाकांत मेघ:श्याम, अंबरनाथ
कुवर मोनिका दिलीप, अंबरनाथ
कुलकर्णी अपर्णा प्रसन्न, अंबरनाथ
कांबळे बाळासाहेब नामदेव, अंबरनाथ
फिरके सुनंदा पंढरीनाथ, अंबरनाथ
वाहेर नीता मनोहर, अंबरनाथ
राजे समीर अरविंद, अंबरनाथ
शर्मा जादोराम छोटाराम, अंबरनाथ
जोशी माधुरी प्रभाकर, अंबरनाथ
भोईर अर्पिता अशोक, अंबरनाथ
फुलोरा भरत काथोड, अंबरनाथ
आठल्ये सुहास पांडुरंग, अंबरनाथ
मागाडे जमुना शत्रुघ्न, अंबरनाथ
मोरे प्रशांत नंदकुमार, अंबरनाथ
उहाळे किरण दुर्गादास, अंबरनाथ
लऊळकर धनंजय लक्ष्मण, पंढरपूर
रुपनर सुनील शिवाजीराव, पंढरपूर
कुलकर्णी अरुणकुमार गोपाळराव, पंढरपूर
कुलकर्णी दामोदर विनायक, पंढरपूर
दशपांडे उमेश कृष्णाजी, पंढरपूर
आपटे विनयकुमार सदाशिव, पंढरपूर
देशपांडे महेश मुकुंद, पंढरपूर
जोशी मिलींद रवींद्र, पंढरपूर
जोशी नरसिंह दत्तात्रय, पंढरपूर
चव्हाण अरविंद बाबूराव, वाई
कंदटू जयघोष आ., वाई
निकम सुमन आनंदराव, वाई
अभ्यंकर शंतनू शरद, वाई
जायगुडे उमेश दत्तात्रय, वाई
सुतार शिवाजी तुकाराम, वाई
काकडे विद्या मोहन, वाई
काकडे मोहन बाबूराव, वाई
लांजेकर जगदीश रामचंद्र, वाई
शिंदे अशोक केशव, वाई
मापारी पुष्पा चंद्रकांत, वाई
मापारी चंद्रकांत अण्णासाहेब, वाई
देसाई राजेंद्र अशोक, पिंपरी

बुचडे शिवाजीराव, माळुंजी
भिगवणकर अनिल रा., चिंचवड
देसाई अशोक शंकर, पिंपरी
नवले शोभा दादाराव, निगडी
वर्टी अर्चना, निगडी
ताडपत्रीकर मृणालिनी, चिंचवड
तेलंग अस्मिता, चिंचवड
निंबाळकर ज्ञानेश्वर, चिंचवड
विनोदे घनाजी, वाकड
गुजे सुहास प्रभाकर, अंबरनाथ
कुलकर्णी संजय नारायण, पंढरपूर
खिंवसरा लीलावती, चिंचवड
खिंवसरा कांतिलाल, चिंचवड
बांदकर गीतांजली भाई, निगडी
बांदकर भाई रामचंद्र, निगडी
भुसारी वत्सला ना., पिंपरी
भुसारी नारायण नामदेव, पिंपरी
जाधव मंगला वसंतराव, पिंपरी
तातोसकर छाया विश्वनाथ, चिंचवड
यादव सुलभा सदानंद, पिंपरी
यादव सदानंद, पिंपरी
कणसे स्वाती दिलीप, पिंपरी
कणसे दिलीप ज़ी., पिंपरी
पावळकर विलास ना., भोसरी
पावळकर प्रीतम विलास, पिंपरी
गोगटे श्रद्धा श्रीधर, पिंपरी
शर्मा अनिल, पिंपरी
नाईक पवार साहेबराव, भोसरी
पवार नारायण, भोसरी
माळुंजकर सारंगधर दत्तू, भोसरी
भाटे इंदुमती किसन, भोसरी
खाडे शैला, मोरवाडी
मोरे पुष्पलता, पिंपरी
पावळकर ललिता विलास, पिंपरी
पावळकर अनिकेत विलास, पिंपरी
शेळके दिनकरराव शामराव, लोहारे
पटेल बशीर अहमद, जळगाव
पाटील डॉ. उल्हास, जळगाव
पाटील विलास कांतिलाल, एरंडोल
मोरे राजेंद्र सायबु, हडपसर
राक्षे अरुणा दीपकांत, हडपसर
राक्षे संदीप दीपकांत, हडपसर
राक्षे अश्विनी दीपकांत, हडपसर
दैठणकर गीतांजली विश्वास, हडपसर
नायर टी. व्ही. जी. हडपसर










माळी कृष्णराव गो., हडपसर
पवार निवृत्ती दत्तात्रय, हडपसर
पुजारी राजेंद्र शामराव, हडपसर
माळी रतन नथू, हडपसर
माळी नानाभाऊ नथू, हडपसर
कोरडे शहाजी राजाराम, हडपसर
गुजर सुशीलकुमार प्रल्हाद, हडपसर
जाधव सुरेखा सुरेश, हडपसर
शिंदे सुमन दशरथ, हडपसर
कान्हेरे अरविंद विनायक, हडपसर
मेहता नीलिमा माधव, हडपसर
गाडगीळ उमा उदय, हडपसर
काळे जगन्नाथ मार्तंड, हडपसर
देसाई उषा जगन्नाथ, हडपसर
देसाई जगन्नाथ पांडुरंग, हडपसर
जावळकर अंजली रोहिदास, हडपसर
तरवडे शुभांगी भक्तिप्रसाद, हडपसर
कवडे सुमित्रा लक्ष्मण, हडपसर
माने तानाजी तुकाराम, हडपसर
पवार मनीषा अनिल, हडपसर
शहा सचिन सुमतीलाल, हडपसर
शिंदे वंदना बारकू, हडपसर
शितोळे अलका रामचंद्र, हडपसर
शेख इम्तियाज अजमुद्दीन, हडपसर
माळी उषा कृष्णराव, हडपसर
पाटील वसंतराव गणपतराव, हडपसर
पाटील उषा वसंतराव, हडपसर
देशपांडे संध्या हेमंत, पुणे
पठारे भागवत शिवराम, हडपसर
तौर मच्छिंद्र बाजीराव, हडपसर
गायकवाड शोभा पंढरीनाथ, कोंढवा
भिसे सुवर्णलता रमेश, हडपसर
नवले अलका संभाजी, हडपसर
भांवळ मोहन, पुणे
कांबळे सुभाष नामदेव, येरवडा
कुंभार ज्ञानेश्वर महादेव, लोणीकाळभोर
वाघमारे सुदाम बाबूराव, येरवडा
सावणे शरण बसण्णा, हडपसर
शिंदे भिवा दादू, हडपसर
पिंजरी महिबूब चांद, पुणे
धेंडे अलका कमलाकर, हडपसर
काळे साहेबराव मारुती, हडपसर
काळे साहेबराव मारुती, हडपसर
ठवाळ दशरथ वामन, हडपसर
गोंघळे जयसिंगराव अर्जुनराव, हडपसर
राऊत संजय महादेव, हडपसर
विभुते यशवंत गुरुलिंग, हडपसर
वाल्हेरे महादेव रंगनाथ, हडपसर
गायकवाड ईश्वर भगवान, हडपसर
जाधव जयप्रकाश मुरलीधर, हडपसर
पवार यशवंत गोपाळ, हडपसर
गोंधळे प्रशांत विलासराव, हडपसर
पवार उत्तम एकनाथ, हडपसर
कोकाटे गुंफा पाटीलबा, हडपसर
खांबे सुधाकर धर्माजी, येरवडा
कन्हेरे अविरत अरविंद, हडपसर
कुंभार राजाराम रावसाहेब, हडपसर
कांबळे रोहिणी यादवराव, हडपसर
परमार पिटर मधुकर, हडपसर
घुले अशोक माधवराव, मांजरी फार्म
गायकवाड संभाजी सुदाम, मांजरी फार्म
आल्हाट एकनाथ राजाराम, हडपसर
वज्रशेट्टी स्वाती शिवानंद, हडपसर
कापडणीस शकुंतला पांडुरंग, हडपसर
रसाळ राजेश शिवाजी, हडपसर
देसाई प्रसाद जगन्नाथ, हडपसर
उत्तुरकर अभिजित विकास, पुणे
ब्रह्मे अरविंद, पुणे
कार्यवाह, मराठी वाङ्मय परिषद, वडोदा
दळवी एच. डी., मुरबाड
देशमुख गणेश दिनकर, कोपरगाव
ब्रह्मे पद्माकर वसंतराव, पिंपरी
नाईक मधुसूदन प्रकाश, पुणे
कुलकर्णी दीपक सखाराम, पुणे

## नवीन आजीव सदस्य टिटवाला शाखा, जि. ठाणे.

जोशी यशवंत श्रीधर
पणशीकर नरहरी विष्णू
जोशी गोविंद विष्णू
कांबळे वैशाली वैभव
चाटुफळे राहुल रमेश
कुलकर्णी उल्हास पांडुरंग
खांजोडे विष्णू रायो
जांभुळकर यशवंत रघुनाथ
दळवी कृष्णकांत रामचंद्र
जाधव सुनील माणिक
वर्तक शामला श्रीकृष्ण
भानू महादेव चिंतामणी
वैद्य आनंद शशिकांत
ढागे विजय मुरलीधर
गोरवाडकर राजेंद्र विनायक
हिरे उत्तम शिवराम
नांदगावकर प्रमोद धर्मा
पुराणिक विवेक काशिनाथ
परटोले अरविंद गणपत
कुलकर्णी अनिल यशवंत
सुब्रह्मण्यम् एन्. व्ही.
कर्डेकर शशिकांत लक्ष्मण
सोनजे दीपक रामचंद्र
वेलेकर विलास प्रेमदास
पाठक जगन्नाथ दत्तात्रय
देवधर श्रीकांत यशवंत
कोदारे राजेश द.
महाजन अनिल पांडुरंग
भदे यशवंत नरहर
वैद्य अच्युत विनायक
कदम सत्यवती जगन्नाथ
जोशी रामचंद्र त्र्यंबक
पै देवदास मनोहर
केळेवाडीकर मंगला केशव
पाटील रविंद्र हरिश्चंद्र
जोशी शलाका चिंतामणी
साठे गजानन कृष्णाजी
महाले नीता नितीन
कंडारकर सुलभा जयंत
महाजन मधुकर एकनाथ
अय्यर आर. रविंद्र
जोशी सविता अनिल
कुलकर्णी नरेंद्र पांडुरंग
देसाई प्राची प्रमोद
महाजन जयंत रामचंद्र
बसवर बी. आर.
दलाल चंद्रशेखर नारायण
बनसोले प्रतिभा जगदीश
दीक्षित माधव मुकुंद

## नवीन आजीव सदस्य मुरबाड शाखा, जि. ठाणे

विशे दिगंबर नारायण
राणे सुदाम रायां
खापरे धनाजी केशव
यशवंतराव वि. वा.
देसले भगवान लक्ष्मण
वांगर योगेंद्र शांताराम
गोडांबे संदेश रघुनाथ
सूर्यराव जयवंत विनायक
पाटील शंकर मारुती
विशे अरविंद पालो
वांगर सुरेश नारायण
ठाकरे अनिल विठ्ठल
म्हात्रे सुजाता सुरेश
तेलवणे मोहनीश विजय
सोनावणे अरुणोदय ओंकार
लोहार भानुदास देवलाल
जाधव प्रभाकर फकिरा

शिंदे अल्का आत्माराम
सूर्यवंशी एस्. वी.
जाधव आनंद लक्ष्मण
पाडवी राकेश जयंत
तोंडलीकर महेंद्र वळीराम
जाखोडिया जुगलकिशोर जयनारायण
वांगर संगीता रामभाऊ
मोघे विश्वास गोपाळराव
जोशी चिंतामणी अनंत
मेहंदळे सुभाष यशवंत
वगाडे सुनंदा रामचंद्र
रोचलानी दलाल कन्हैयालाल
पुरोहित उत्तमकुमार भुराराम
साळुंखे दिलीप नथू
वडगुजर राजाराम धनाजी
कोलटणकर अरुण नारायण
देसले प्रभाकर भागोजी

शहाणे अशोक गोपाळ
गुजर रुपेश नरहरी
पातदार पुष्पराज रमाकांत
राऊत जनार्दन शंकर
चव्हाण रचना रविंद्र
जाधव महेंद्रसिंग बापूसिंग
वैरागी विद्या प्रविण
भारंबे यामिनी दिगंबर
विशे काशिनाथ तुकाराम
देशमुख दिलीप लक्ष्मण
भालेराव रामचंद्र भागाजी
फेगडे आनंद भगवान
तायडे भीमराव माणिकराव
कोठावदे सुदामा दिगंबर
कुलकर्णी श्रीराम चिंतामणी
अधिक रावजी यशवंतराव

## नवीन आजीव सदस्य मुरबाड शाखा, जि. ठाणे.

जाडकर मिलिंद नारायण
दामले प्रफुल्ल अनंत
कोठारी संतोष दत्तात्रय
मालवणकर रमाकांत मोहन
जोशी परशुराम राजाराम
नेने प्रकाश दामोदर
शंकर माधवी रमण
दामले चंद्रशेखर पुरुषोत्तम
गुजराथी नंदकुमार दत्तात्रय
गुजराथी राखी नंदकुमार
तुरवाडकर अनुराधा अनिल
तलाठी रमणलाल चंदूलाल
मोदी विवेक केशव
संसारे उमेश गोपीनाथ
माजलेकर निनाद शशिकांत
बुटाला शिरीष परशुराम
भिडे कल्पलता विजय

वंड आदिकुमार भगवंतराव
देवगडे रश्मी आनंद
खातू गौरीहार रंगनाथ
पेले शीतल शशिकांत
बुटाला कौतुमभाई हिराचंद
बुटाला पल्लवी कौतुमभाई
गांधी दिलीप महादेव
गांधी किशोर महादेव
तलाठी सुरेंद्रकुमार चंदुलाल
तारे प्रा. डॉ. अभय
नायक अशोक नरसिंह
वडे डॉ. कुसुमावती
शेठ चंदुलाल काशीराम
बुटाला संजय शरद
बुटाला सुनील शरद
तलाठी अरविंद चंदुलाल
तलाठी डॉ. उपेंद्र

जैन उत्तमकुमार सुखराज
देसाई शहाबुद्दीन अब्दुल
मोहिमतुले मेहबुबभाई इब्राहिम
पाटणे गया दिपक
गोळे गौरी उमेश
मोदी संजय वसंत
शेट जयंत रघुनाथ
निवेकर मधुसूदन काशिनाथ
कुलकर्णी पद्मा श्रीकांत
दांडेकर शशिकांत बाळाराम
पुलेकर गोविंद मनोहरशेठ
म्हाउदळकर नलिनी सावाजी
लोखंडे राजेश्री शरद
मोरे शंकर महादेव
साळुंखे चंद्रशेखर रविंद्रनाथ
आवटी अनिता जयपाल

---

**मागील अंकातील आवाहनाप्रमाणे खालील देणगीदारांनी रु. ३००/- जमा केले आहेत.**
कुलकर्णी जयश्री गोविंद, धुळे , देवधर सौ. मेघना विनायक, पुणे

---

# म.सा.प. तर्फे घेतल्या जाणाऱ्या परीक्षेसंबंधी

*मराठीचा बाणा। सार्थ अभिमान*
*बाळगावे ज्ञान। मराठीचे॥*

*या वर्षी परीक्षासमितीने २००२ ते २००५ या वर्षाच्या कालावधीसाठी नवीन अभ्यासक्रमाची निवड केली आहे.*

*प्रथमा परीक्षेसाठी एकूण १०० गुणांची एकच प्रश्नपत्रिका असून 'घामाची फुले' अर्थात् सानेगुरुजींच्या गोड गोष्टी (भाग-२) या पाठ्यपुस्तकावर तसेच व्याकरण व लेखनावर आधारित ही प्रश्नपत्रिका असेल.*

*'प्रवेश' परीक्षेसाठी एकूण २०० गुणांच्या दोन प्रश्नपत्रिका असून जाईजुई (य.गो. जोशी) व काव्यगंगा (संपादक : डॉ. भीमराव कुलकर्णी) या गद्य-पद्य संग्रहावर आधारित पहिली प्रश्नपत्रिका असून व्याकरण, अलंकार, लेखन व भाषांतराचा दुसऱ्या प्रश्नपत्रिकेत समावेश असेल.*

*'साहित्य-प्राज्ञ'साठी एकूण ३०० गुणांच्या तीन प्रश्नपत्रिका आहेत. त्यात सारे प्रवासी घडीचे (जयवन्त दळवी), अंमलदार (पु. ल. देशपांडे) आणि जोगिया (ग. दि. माडगूळकर) या अर्वाचीन गद्य-पद्यावर आधारित १०० गुणांची एक प्रश्नपत्रिका, आणि पु. भा. भावे या विशेष ग्रंथकार म्हणून अभ्यासासाठी निवडलेल्या ग्रंथकाराच्या 'सतरावे वर्ष', 'अकुलिना', 'रक्त आणि अश्रू', 'वाकुल्या' या कथा-कादंबरी-वैचारिक निबंध-ललित लेख इत्यादी वाङ्मयप्रकारांच्या अभ्यासावर आधारित दुसरी १०० गुणांची प्रश्नपत्रिका आहे. तिसऱ्या १०० गुणांच्या प्रश्नपत्रिकेत सर्व प्रकारच्या व्याकरण लेखनाचा समावेश असेल.*

*'साहित्य-विशारद' परीक्षेसाठी एकूण ६०० गुणांच्या सहा प्रश्नपत्रिका आहेत. शतपत्रे (लोकहितवादी) आणि अग्निनृत्य (शि. म. परांजपे यांचे संपादित निबंध) या ग्रंथाभ्यासास १०० गुण, ज्ञानेश्वरी अध्याय पहिला आणि महानुभाव गद्य (संपादक : शं. गो. तुळपुळे) या ग्रंथाभ्यासास १०० गुण, अर्वाचीन 'कथा' वाङ्मयाच्या अभ्यासास १०० गुण, भारतीय साहित्य शास्त्राची मूलतत्त्वे - १०० गुण, भाषाविज्ञान व व्याकरण - १०० गुण आणि उपयोजित मराठी-१०० गुण अशा ६०० गुणांच्या सहा प्रश्नपत्रिका असतील.*

*प्रथमा, प्रवेश व साहित्य-प्राज्ञ अभ्यासक्रमाचा कालावधी प्रत्येकी एक वर्षाचा असून, त्यासाठी परीक्षा शुल्क अनुक्रमे १५, ३० आणि ५० रु. ठेवलेले आहे. 'साहित्य-विशारद'चा कालावधी दोन वर्षांचा असून परीक्षा शुल्क १०० रु. (दोन वर्षांसाठी) ठेवलेले आहे. साहित्य-विशारदच्या एकूण सहा प्रश्नपत्रिकांपैकी १ ते ३ प्रश्नपत्रिका पहिल्या वर्षी ५० रु. परीक्षा शुल्क भरून तर ४ ते ६ प्रश्नपत्रिका दुसऱ्या वर्षी ५० रु. शुल्क भरून देण्याची सोयही उपलब्ध आहे. सर्व परीक्षा जानेवारी महिन्याच्या पहिल्या किंवा दुसऱ्या आठवड्यात घेतल्या जातात.*

**डॉ. कल्याण इनामदार,**
निमंत्रक व परीक्षाप्रमुख,
फोन : ९५२०-५४४३७७७

Maharashtra Sahitya Patrika Quarterl y No. '298 - July, August, September 2001.
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57

प्रति,

प्रेषक : प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.



अनुक्रमणिका